# प्रस्तावना



विद्यार्थ्यांना काव्यमाधुरी स्वतंत्रपणें चाखता यावी, आयुष्य आनंदमय, हासमय व सुंदर करण्यास काव्य कसें साहाय्यभूत होतें हें त्यांना कळावें त्या दृष्टीनें त्यांनीं त्याचें वाचन करावें या हेतूनें प्रस्तुतचा कवितासंग्रह म्हीं तयार केला आहे.

आतापर्यंत विद्यार्थ्यांकरितां जे मराठी कवितासंग्रह प्रसिद्ध करण्यांत ले आहेत, त्याहून अगदीं भिन्न पद्धतीनें 'महाराष्ट्र रसवंती' चें संपादन म्हीं आदरलेलें. समान विचारपद्धति, समान घडण व समान स्वरूप असलेल्या कवितांचा एक एक स्वतंत्र विभाग पाडून, त्यांतील संगीत, सौंदर्य, कल्पनाविलास, कलाचातुरी व भाषेच्या झिरझिरीत पडद्यामागून वाहणारे भावनांचे व विचारांचे प्रवाह यांचा मनोरंजक रीतीनें परिचय करून देण्याचा यांत प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांची जिज्ञासु वृत्ति वाढावी, त्यांच्या कल्पनाशक्तीला चालना मिळावी, काव्यवाचन वाढविण्याकडे प्रवृत्ति व्हावी या हेतूनें प्रत्येक विभागाच्या शेवटीं 'स्वाध्याय' दिला आहे कविता शिकतांना किंवा शिकवितांना, विद्यार्थी व शिक्षक या दोघांनाहि ही अनुसरलेली पद्धति उपकारक वाटेल अशी आशा आहे

'महाराष्ट्र रसवंती' चे तीन भाग पाडले असून, त्यांचा मिडल स्कुलें, हायस्कुलें, त्याचप्रमाणें मराठी ट्रेनिंग स्कुलें व कॉलेजें, यांत शिकविण्याकडे उपयोग व्हावा असा हेतु आहे.

या संग्रहांत ज्ञानेश्वरांपासून तों फडके, माडगांवकर प्रभृति विद्यमान तरुण कवींपर्यंत ज्यांच्या ज्यांच्या कविता घेणें शक्य झालें त्यांच्या त्यांच्या

वैशिष्ट्यपूर्ण वैचित्र्याचा पोषक अशा निवडक कविता घ्यात घेत आहेत

- हे तिन्ही भाग जसे विद्यार्थ्यांना तसेच सर्वसामान्य वाचकांना मराठी काव्याच्या स्वरूपाची कल्पना आणून देण्यास व काव्यवाचन गोडी उत्पन्न करण्यास सहाय्यभूत होतील अशी आशा वाटते

या पुस्तकाच्या कोणत्याहि भागाचा अभ्यास करताना, राहि दोन भाग पुरवणीदाखल वाचल्यास कविता समजण्यास सुलभ जाईल कवि वाचताना कोणती दृष्टि ठेवून ती वाचावी याचेंच केवळ दिग्दर्शन विवेचन केलें असल्यामुळें स्वत च्या स्वतत्र अभ्यासाची व विचाराची त्यात टाकून शिकविण्यास शिक्षकाना भरपूर वाव आहे किंबहुना तसें त्या करून, मुलात चोखदळपणा आणावा या हेतूनें स्वाध्यायाची जोड दि आहे.

प्रत्येक विभागात, शिक्षकाला आपल्या आवडीप्रमाणें किंवा विद्या र्थ्यांच्या कुवतीप्रमाणें कविता निवडून शिकविता याव्या याकरिता भरपू कविता दिल्या आहेत

जी कविता शिकवावयाची ती वृत्तात्मक असल्यास, त्यातील एकेक श्लोक वर्गातील एकेका विद्यार्थ्याकडून म्हणवून घ्यावा ती गेय असल्यास शिक्षकाने स्वत गाऊन किंवा मधुर आवाजाच्या विद्यार्थ्याकडून गावधून दाखवावी, आणि मग ती शिकवू लागावें कविता योग्य तऱ्हेनें गायिली गेल्यास त्यातील रस व अर्थ लक्षांत येण्यास वेळ लागत नाहीं कवितेचा विषय, कल्पना व मथितार्थ विद्यार्थ्यास प्रश्न विचारून काढून घ्यावा या कामीं पुस्तकातील विवेचन उपयोगी पडेल एवढें झाल्यावर वृत्ताची माहिती, कठिण शब्दांचे अर्थ वगैरे सागून, पुन्हा एकदा ती कविता, अर्थासहित

देऊन, नुसती वाचावी. विद्यार्थ्यांना कोणत्या कल्पना, कोणते शब्द किंवा कोणत्या ओळी आवडतात तें विचारावें व कवीचें विशिष्ट ठिकाणचें कौशल्य त्यांच्या नजरेस आणून द्यावें. स्वाध्यायात निर्देशिलेल्या व शिक्षकास सुचवाव्याशा वाटतील त्या दुसऱ्या कविता शिक्षकानीं कांहीं व विद्यार्थ्यांनीं कांहीं वर्गांत म्हणाव्या.

प्राचीन कवींची कविता शिकवितांना शिक्षकानें प्रथम मथितार्थ सांगून, अवघड शब्दांचे अर्थ सांगावे, व दुसऱ्या पाठाचे वेळीं, काव्य व कल्पना याकडे लक्ष द्यावें. तिसऱ्या पाठाचे वेळीं कवीची माहिती, वृत्ताची माहिती, पौराणिक उल्लेखाचें व दृष्टांताचें विवरण, भाषाशैलीचें विवेचन इत्यादि कामे करावीं. एवढें सर्व झाल्यावर शेवटीं कवितेचे काव्यदृष्ट्या वाचन करण्यास मात्र विसरू नये.

ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांना त्याचप्रमाणें एकंदर काव्यप्रेमी मराठी वाचकांना मराठी काव्याचा रसास्वाद स्वत घेता यावा व मराठी काव्यसंपत्तीची थोडीशी तरी कल्पना येऊन त्यांचा स्वभाषाभिमान वाढावा हीहि दृष्टि 'महाराष्ट्र-रसवती' च्या तिन्ही भागांचें संपादन करतांना ठेवण्यात आली आहे.

शृंगाररस थोडाबहुत वर्ज्य केला तरी इतर रस रंगविण्यांत मराठी कवितेनें केवढें यश संपादन केलें आहे, हें हीं पुस्तकें वाचून मार्मिकांच्या लक्षांत येईल.

काव्यवाचनाचा आनंद लुटीत असतां, अनायासें भाषेचा व्यासंग घडून वाचकांच्या अंगीं जास्त रसिकता यावी अशाच पद्धतीनें तिन्ही विभागांतील कवितांचें वर्गीकरण करून, विवेचन केलें आहे

येथें एक थोडासा खुलासा करावासा वाटतो अर्वाचीन कवींपैकीं बहुतेक सर्व प्रमुख कवींच्या कविता 'रसवती' त समाविष्ट केल्या असतां

केशवसुतांची एकहि कविता यांत आढळत नाहीं हें पाहून पुष्कळांस आश्चर्य वाटेल. पण अपरिहार्य परिस्थितीमुळें चार कविता निवडूनहि, त्या अगदीं नाइलाजानें एका बाजूस काढून ठेवाव्या लागल्या. असें असलें तरी स्वाध्यायांत, केशवसुतांच्या ज्या कविता विद्यार्थ्यांनीं अभ्यासाव्या असें आम्हांस वाटलें, त्यांचा आग्रहपूर्वक नामनिर्देश आम्ही वेगवेगळ्या ठिकाणीं केला आहे.

या पुस्तकांतील स्वाध्याय लिहिताना बडोदें येथील महाराणी हायस्कुलांतील माजी अध्यापिका सौ. शालिनीबाई रानडे ( कु. गीताबाई हेर्लेकर, बी. ए. ) यांची आम्हास बरीच मदत झाली. त्याबद्दल त्यांचे आम्ही आभारी आहोंत.

प्रस्तुत संग्रहात ज्यांच्या ज्यांच्या कविता आम्हीं घेतल्या आहेत त्या सर्व कवींचे, त्याचप्रमाणें दिवंगत कवींच्या कवितांचे प्रकाशनाचे हक्क ज्यांच्याकडे आहेत त्या सद्‌गृहस्थांचे व प्रकाशनसंस्थांचे कविता प्रसिद्ध करण्याची परवानगी दिल्याबद्दल आम्ही आभारी आहोंत. 'रसवंती'च्या पहिल्या दोन भागांतील चित्रे मुंबईंतील प्रसिद्ध तरुण चित्रकार श्री. वामनराव लाड यांनीं काढलीं असून, तिसऱ्या भागांतील कांहीं चित्रें येथील जे. जे. आर्ट स्कूलमधील कलाध्यापक श्री. धोपेश्वरकर यांनीं काढलीं आहेत. या उभयता चित्रकारांनीं मनाजोगतीं चित्रें काढून देऊन आम्हास उपकृत केलें आहे. त्या दोघांचेहि आम्ही आभारी आहों.

संपादक

# आमच्या विद्यार्थि-मित्रांस

प्रिय मित्र,

गेल्या वर्षी, आषाढ शु ११ च्या दिवशीं 'रसवंती'च्या कामास सुरवात करून आज वर्षप्रतिपदेच्या दिवशीं तें पूर्ण करीत आहों. हा जवळ जवळ नऊ महिन्यांचा काळ एखाद्या सुंदर स्वप्नाप्रमाणें निघून गेला. नव्या नव्या कविता हुडकायच्या, स्वतःशींच गुणगुणायच्या, टिपून घ्यायच्या, आपसांत किंवा आप्तजनांत त्यावर चर्चा करायची, आणि त्या सर्वांना आवडल्या म्हणजे त्यावर स्वतःचें भाष्य लिहायला सुरवात करायची. तुम्ही जसे खेळांत किंवा सोबत्यांशीं गप्पा मारण्यांत गुंग होऊन जातां, भोंवतालचें सारें सारें विसरतां, तसें अगदीं झालें होतें आमचें. खूब खूब मजेंत गेला आमचा वेळ आणि या घालविलेल्या वेळाची गोड आठवण झाली, फुलाभोंवतीं रुंजी घालणाऱ्या फुलपाखराप्रमाणें काव्यपुष्पाभोंवतीं घातलेल्या त्या रुंजींची आठवण झाली म्हणजे वाटतें, 'किती रम्य तो काळ!' अगदीं नादावून गेलों होतों आम्ही! धुंदीच चढली होती आम्हाला! या नादांत, या धुंदींत खरा आनंद आहे, बर! 'रसवंती'चीं हीं तिन्ही पुस्तकें वाचलींत म्हणजे येईल तुम्हाला या आनंदाची कल्पना! कल्पना का? या आनंदांतच तुम्हीं काहीं क्षण पोहावें, या हेतूनेंच तर या पुस्तकाची रचना आम्हीं केली

आमचा हा हेतू पूर्ण झालेला दिसला म्हणजे आम्हाला सर्व कांहीं मिळालें. तुमच्या आनंदांत आमचा खरा आनंद आहे

'रसवंती'चीं पृष्ठें चाळतांना, तुम्हाला जी कविता आवडेल ती वाचून स्वतःला कां आनंद वाटला, याचें मनाशींच कारण ठरवून आमचें भाष्य वाचा. तुमच्या मतांशीं आमचीं मतें जुळलीं किंवा आमचा एखादा दृष्टिकोन तुम्हाला नवीन वाटला तर उत्तमच झालें.

कविता पुन:पुन्हा वाचा. प्रत्येक वाचनाचे वेळीं तुम्हाला अधिकाधिक आनंद होईल; कवितेंतील बारीक खाचाखोंचाहि तुम्हाला त्यायोगें कळू लागतील.

अशा तऱ्हेनें 'रसवन्ती'च्या तिन्ही भागाचें मार्मिक वाचन झाल्यावर कोणताहि काव्यसंग्रह तुम्हीं वाचूं लागला तर त्यातील रसास्वाद घेण्याची, दोष जाणण्याची, मार्मिक परीक्षण करण्याची तुमची पात्रता तुम्हींच या नवीन तऱ्हेच्या अभ्यासपद्धतीनें वाढवून घेतली आहे, असें तुम्हाला आढळून येईल. असो.

आज या नूतन वर्षाच्या पहिल्या दिवशीं तुम्हाला ही अल्पशी वाङ्मयिक भेट देत आहों ती गोड करून घ्या हीच विनति.

चै शु १ शके १८५७,
कर्नाटक हाउस, गिरगाव,
मुंबई (२)

तुमच्या आनंदानें आनंदित होणारे
तुमचे
श्रीधर बाळकृष्ण रानडे
गंगाधर देवराव खानोलकर

---

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

विद्यार्थी व शिक्षक यांच्या हातीं ही नवी आवृत्ति देताना आम्हाला आनंद होत आहे. गेल्या वर्षी एक शैक्षणिक नवा प्रयोग म्हणून आम्हीं 'रसवती'चें प्रकाशन केलें, आणि त्याचें शिक्षकवर्गाकडून जें फार मोठ्या प्रमाणांत स्वागत झालें त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होणार आहेत.

आक्टोबर १९३६

संपादक

## १४ मराठी भाषा



## १५ आपला महाराष्ट्र

# १ प्राचीन कवींची कविता

ज्ञानेश्वर [ जन्म शके ११९७, समाधि शके १२१८ ]. यांच्याइतका श्रेष्ठ, ज्ञानी व भाषाप्रभु आजवर महाराष्ट्रांत झाला नाहीं. ते समाधिस्थ झाल्याला सहाशें वर्षांहून अधिक वर्षें होऊन गेलीं, पण त्यांनीं निर्माण केलेल्या सारस्वताचा परिमळ, त्या वेळेप्रमाणेंच, आजहि महाराष्ट्रभर, दरवळून राहिला आहे. ज्ञानेश्वरांनीं रचलेला मुख्य आणि महत्त्वाचा ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' होय. श्रीमद्भगवद्गीतेवरील ही टीका आहे. या ग्रथांत अनुभव, काव्य व तत्त्वज्ञान याचा सुंदर मिलाफ झालेला आहे. या ग्रंथाखेरीज 'अमृतानुभव,' 'चांगदेव पांसष्टी' हे ग्रंथ व कांहीं अभंग यांनीं लिहिलेले आहेत. याची भाषा उपमा, अलंकार, दृष्टांत यांनी नटलेली असते. आपलें भाषाप्रभुत्व दाखविण्याकरितां मात्र त्यांनीं त्यांचा उपयोग केलेला नाहीं, तर कोणताहि विचार सुगम करण्याकरिताच त्यांनी त्यांचा उपयोग केलेला आहे. 'साधूची आत्यंतिक समता' व 'शुचित्व' या दोन उताऱ्यांवरून तुम्हांला त्याची थोडीशी कल्पना येईल. पहिल्या उताऱ्यात खऱ्या साधूची वृत्ति कशी असावयाला पाहिजे याचें विवेचन केलें असून, दुसऱ्या उताऱ्यात परमार्थाचें साधन करूं इच्छिणाऱ्या साधकाच्या अंगीं आवश्यक असलेल्या 'शुचित्वाचें' वर्णन केलें आहे. 'शुचित्व' कशाला म्हणावयाचे याची इतकी मार्मिक व सुंदर फोड क्वचितच केलेली आढळेल.

रामदास [जन्म शके १५२०, समाधि शके १६०३]. ज्ञानेश्वरांचा ज्ञानेश्वरी' हा ग्रथ जसा त्यांच्या इतर ग्रंथांहून विशेष प्रसिद्ध आहे, तसाच रामदासांचा 'दासबोध' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. मात्र ज्ञानेश्वरींतील उच्च प्रतीचें कवित्व व भाषासौष्ठव यांत सांपडणार नाहीं. यांतील भाषा साधी पण आवेशपूर्ण व विचार प्रापंचिकांना पटणारे व मार्गदर्शक असे आहेत. या ग्रंथांतूनच 'कवीश्वरस्तवन' हा उतारा घेतला आहे यांत कवीचें महत्त्व व त्याचा अधिकार यांचें वर्णन केलें आहे.

रघुनाथ पंडित. हा कवि, शहाजी व शिवाजी यांच्या कारकीर्दीत होऊन गेला. याची कारकीर्द दयान तंजावराकडे गेली असें म्हणतात. याचा जन्मकाल किंवा जन्म-

स्थल हीं निश्चित सांगतां येण्याजोगीं साधनें अद्याप उपलब्ध झालेलीं नाहींत. त्याच-प्रमाणें हा रघुनाथ पंडित, नलदमयंती-स्वयंवराख्यानाचा कर्ता कोण याचाहि नीट शोध लागलेला नाहीं. कांहीं अभ्यासकांचें म्हणणें कीं, तो शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं एक होता. कांहींचें त्याहून वेगळें मत पडतें. अलीकडे या संबंधीं मराठी मासिकांत बरीच चर्चा झाली, पण निर्णय लागला नाहीं. असो. हें आख्यान रचणारा रघुनाथ पंडित कोणीहि असो, तो एक पहिल्या दर्जाचा कवि आहे यांत संशय नाहीं. याच्या काव्यकलेसंबंधीं व प्रस्तुतच्या आख्यानासंबंधीं महाराष्ट्रसारस्वतकार भावे यांनीं काढलेले पुढील उद्गार मननीय आहेत. "याची रचना व याचें कल्पनाचातुर्य फारच अप्रतिम आहे. अगदीं आरंभापासून तों अखेरपर्यंत रघुनाथ पंडितानें आपलें नलदमयंती-स्वयंवराख्यान संस्कृत काव्य शास्त्राच्या नियमांस धरून, थेट पंचमहाकाव्यांच्या थाटावर रचिलें आहे. याची रचना ठावठिकाणीची असून यातला मुग्ध शृंगार फार बहारीचा उतरला आहे. प्रसिद्ध ग्रीक कवयित्री साफो इच्या एकाच कुटक्यावर तिची कीर्ति अजरामर झाली, तशी एका ' नलदमयंती-आख्यानावर ' पंडितांची कीर्ति आजपर्यंत अबाधित राहिली आहे व पुढील कैक काळपर्यंत ती तशीच राहील हें उघड दिसत आहे...सहज स्फूर्तीनें मन उचंबळून जावें, आणि तोंडांत शब्द येऊन काव्य रचीत जावें अशी रचना पंडितांची नाहीं. यांच्या सरस्वतीदेवीची मूर्ति स्वयंभू नसून, ती फार परिश्रमानें, विशेष काळजीपूर्वक, चातुर्यसर्वस्व खर्चून, बिलकुल कसर न करतां, कुशल कारागिरीनें घडलेली अशी आहे. पदलालित्य, वचनमाधुर्य, उपमाचातुर्य इत्यादि अलंकारांनीं यानें आपल्या देवीस फारच उत्कृष्ट नटविली आहे. हिचें नयनमनोहर असें हृदयंगम रूप पाहून वाचकाच्या मनाला आनंदाचा उमाळा येतो, हें कोणाच्याहि अनुभवास येईल. उत्तम पटवेकऱ्यानें मोत्यांचे दाणे निवडावे व मग सर ओंवून त्यांचा जसा उंची दागिना पटवावा, त्याप्रमाणेंच एकेका शब्दाची निवड करून यानें आपले श्लोक जडले आहेत. याचे एकेका श्लोकाची किंमत एकेका पैलूदार सब्जाबरोबर आहे. उत्तम पाणिदार हिऱ्याचें तेज याच्या श्लोकात आहे. पण ताज्या फुललेल्या फुलाची किंवा फळांची बहार त्यांच्यात नाहीं. याच्या कृतीनें मनाला आनंद होतो पण मन भरून येत नाहीं; तें उचंबळून उड्या घेऊं लागत नाहीं; असो. रघुनाथ पंडित विद्वान् व निष्णात असल्यामुळें त्यानें अनेक चित्रें फारच स्वाभाविक व सुंदर काढिलीं आहेत. आर्धी नलदमयंतीचें आख्यान हें फार सरस आहे आणि तें आज हजारों वर्षें महाराष्ट्राच्या मनाला आनंद व विसांवा देत आहे. पांडव

आपल्या वनवासाचा दुःखमय काळ कंठीत असतां बृहदश्व ऋषी त्याच्या भेटीस गेले. त्या वेळीं धर्मराजानें आपल्या दुःखाची कहाणी त्यांचेजवळ गाऊन माझ्या-इतका कष्टी प्राणी तुमच्या पाहण्यांत कधीं आला आहे काय ? असले काबाडकष्ट कधीं कोणीं काढलेले तुमच्या ऐकण्यांत तरी आहेत काय ? असा त्यांस प्रश्न केला. याप्रमाणें त्या सत्त्वशील राजाचें मन दुःखसागरांत बुडूं लागलेलें पाहून त्याला आधार व्हावा म्हणून ही नळराजाची कथा बृहदश्व ऋषींनीं त्यास सांगितली. या करुणरसप्रधान कथानकांतला पहिला नलदमयंतीच्या विवाहाचाच तेवढा गोड भाग घेऊन, त्यावर हें काव्य पंडितांनीं रचिलें आहे...ह्या कथाभाग सांगतांना रघुनाथ पंडितांनीं स्वभाववर्णन फार मार्मिकपणानें केलें आहे. यामुळें या काव्याला विशेषच गोडी आली आहे."

**मुक्तेश्वर.** प्रसिद्ध संतकवि व सुधारक एकनाथमहाराज याचे हे नातू. यांच्याविषयीं विश्वसनीय अशी चरित्रविषयक माहिती अद्याप उपलब्ध झालेली नाहीं. यांचा काल सतराव्या शतकाचा पूर्वार्धं असावा. यांनीं रामायण व महाभारत यांचीं सुंदर भाषांतरें केलीं. आतांपर्यंत या दोन महाकाव्यांचीं अनेकांनीं भाषांतरें केलीं, पण मुक्तेश्वराच्या भाषांतराची एकालाहि सर येणार नाहीं. दुर्दैवानें त्यांच्या महाभारताचीं पहिलीं चार व शेवटचें एक अशीं पांचच पर्वें आज उपलब्ध आहेत.

मुक्तेश्वरांच्या काव्याबद्दल, प्रसिद्ध टीकाकार व काव्यचर्चिक बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं पुढीलप्रमाणें अभिप्राय व्यक्त केला आहे, " मुक्तेश्वरांची रचना जशी प्रसंग-विशेषीं कठोर व खणखणीत आहे, तशीच प्रसंगानुरूप ती कोमल, प्रेमळ व नाजूकहि आढळते. अक्षरगणवृत्तांचीं बंधनें सहन करण्यापुरता जरी त्यांच्या वाणीच्या अंगीं लवचीकपणा नाहीं, तरी ती उणीव रसभावांचा विचार करितांना नजरेस येत नाहीं. रसभेदाप्रमाणें त्यांच्या शब्दसरणींत तत्काळ भेद झालेला प्रत्ययास येतो. जो वाक्प्रवाह एका ठिकाणीं नायगऱ्याच्या भवभव्याप्रमाणें भूमंडळ दणाणीत, आवर्त-शतानें खळखळत, गंभीर गर्जनेनें अंतराळ घुमघुमवीत, प्रचंड आवेशानें भेडसावीत जातो, तोच दुसऱ्या ठिकाणीं लहानशा झऱ्याप्रमाणें मंजुळ स्वरानें गात, लतातृणांशीं खेळत, सुमदलांना कवळीत, व पशुपक्ष्यांना हसवीत, झुळझुळ वाहतांना पाहिला म्हणजे कोणास बरें कौतुक वाटणार नाहीं ? कालभैरवाचें अक्राडतांडव व अप्सरेचा नाजूक नाच हीं दोन्ही एकाच व्यक्तीला साधलेलीं पाहून मन चकित झालेंच पाहिजे.

मुक्तेश्वराची भाषा जितकी एके ठिकाणीं कर्कश, तितकीच दुसरे ठिकाणीं प्रेमळ जितकी एके ठिकाणीं खणखणीत, तितकीच दुसरे ठिकाणीं लुसलुशीत; जितकी एके ठिकाणीं आवेशी, तितकीच दुसरे ठिकाणीं सद्य; अशी अनुभवास येते व याच गोष्टीनें त्याचें वाक्प्रभुत्व सिद्ध होतें."

मुक्तेश्वरांच्या वर्णनशैलीची कल्पना येण्यासाठीं वेगवेगळ्या प्रकरणांतून येथें वेंचे दिले आहेत, ते लक्षपूर्वक वाचल्यास वर वर्णिलेल्या गुणांचा प्रत्यय तुम्हांला येईल.

**अमृतराय** [ जन्म शके १६२०, मृत्यु शके १६७५ ]. हे औरंगाबादेकडील राहणारे असून, शीघ्रकवि व रसाळ कीर्तनकार होते. याची बरीचशी कविता कटाव-वृत्तात रचली गेली आहे. याच्या कवितेसंबंधीं काव्यसंग्रहकार वामन दाजी ओक लिहितात, "अमृतरायांची वाणी अमृतलहरीसारखी सुधास्राविणी आहे. मराठी भाषेतील उच्च प्रतीच्या कवींत त्याची गणना करण्यास कांहीं हरकत नाहीं. याची कविता प्रासप्रचुर असल्यामुळें ती नुसती ऐकणारासहि गोड वाटते, मग जो अर्थाकडे दृष्टि देऊन ती वाचील, तो तन्मय झाला म्हणून काय नवल ? प्रस्तुत कवीनें वर्णमधुर कविता केली आहे, तरी उगीच क्लिष्टपणा येईल अशी रचना कोठेंच आढळत नाहीं. वर्णनास एकदा प्रारंभ झाला म्हणजे त्यात योग्य ठिकाणीं योग्य शब्दयोजना व्हावयाचीच असें पाहून, त्याच्यापुढें मराठी भाषा हात जोडून उभी असावी असें वाटतें. अमृतरायांच्या काव्यात प्रसादगुण विशेष आहे, भक्तिरस ओतप्रोत भरलेला आहे; त्यांची सर्व कविता सर्व स्थळीं सारखी रसमयी आहे; जो रंग कटिबधात आहे तोच रंग पदांतहि आहे. अमृतरायाचा उपदेश मनावर ठसा उठविण्यासारखा असून फारच सौम्य शब्दांनीं गुंफिलेला आढळतो. अमृतरायाची कविता वाचणारास नुसता काव्यरसपानाचा लाभ घडतो असें नाहीं, तर त्यावेळच्या देशस्थितीचें, रीतीभातींचें, आचारविचाराचें ऐतिहासिक दृष्टपाटि ज्ञान होण्यासारखें आहे."

अमृतरायाचें नाव त्याच्या सुरस काव्यरचनेबरोबरच, 'कटाव' हें अगदीं नवें वृत्त त्यानें मराठींत सुरू केलें, या गोष्टीमुळें तर तें विशेष अमर झालें आहे. त्याचे आधीं या वृत्तात मराठींत कोणीहि काव्यरचना केलेली नाहीं

**अनंतफंदी** [ जन्म शके १६६६, मृत्यु शके १७४१ ] हा अहमदनगर जिल्ह्यातील संगमनेर येथील राहणारा. पोवाडे, पदें, लावण्या, फटके,

ओव्या अशी भिन्न भिन्न तऱ्हेची रचना यानें केली आहे याच्या विक्षिप्त वृत्तीवरून याला फदी ही उपाधी लोकांकडून जोडली गेली 'फदी अनंत कवनाचा सागर। आर्जिक्य ज्याचा हातखडा। चमत्कार चहुकडे डोलतो। सृष्टीवर ज्याचा झेंडा ॥' असे याच्या कवनाबद्दलचे उद्गार दुसऱ्या एका समकालीन शाहिरानें काढले आहेत यानें पहिल्यानें तमासगिरी केली व त्याकरिता उत्तमोत्तम लावण्या रचल्या, पण पुढें तो पेशा टाकून तो कीर्तनकार बनला याची वाणी मुळचीच रसाळ आणि त्यात काव्यदेवी तर याजवर सदा प्रसन्न, अशा स्थितींत जनमनें आनदानें डुलली नाहींत तरच आश्चर्य! अनंतफंदीच्या लावण्यापेक्षा त्याचे फटकेच अधिक प्रसिद्ध आहेत आणि येथें दिलेला त्याचा फटका तर आज शें-सवाशें वर्षे आबालवृद्धाच्या तोंडीं बसला आहे यात त्यानें सूत्रमय पद्धतीनें माडलेले आयुष्यातील वागणुकीचे व व्यवहाराचे विचार कुणालाहि पटतील, महत्त्वाचे वाटतील हा फटका दारोदार भिक्षा मागत फिरणाऱ्या कोल्हाटयाच्या तोंडून तुम्हीं अनेकदां ऐकला असेल जनहृदयावर पकड बसविणारें एखादें काव्य निर्माण झालें म्हणजे तें समाजाच्या खालच्या तळापर्यंत कसें प्रसार पावतें याचें, फदीबुवाचा हा फटका, हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे

**मोरोपंत** [इ स १७२९–१७९४] पेशव्याच्या ऐन भरभराटीच्या काळात याची सर्व हयात गेली पेशव्याचा व्याही व सावकार बाबुजी नाईक बारामतीकर याच्यासारखा आश्रयदाता मिळाल्यामुळें अध्ययन व लेखन याना आवश्यक असलेलें सर्व प्रकारचें स्वास्थ्य यास मिळालें बारामतीकराकडे पुराण सागावयाचें व इतर वेळ काव्यलेखनात किंवा संस्कृत काव्याच्या वाचनात घालवावयाचा असा त्याचा क्रम असे "याचें काव्य वाङ्मयदृष्टीनें निरनिराळ्या तऱ्हेचें व विपुल आहे त्याची कविता अशी आहे कीं, तींत महाकाव्य, आख्यानें, कीर्तें, भक्ति, उपदेश, रस, अलकार सर्व काहीं आहे मोरोपतासारखा मराठी भाषेवर उपकार करणारा प्रथकार झालाच नाहीं असें म्हणण्यास बिलकुल दिक्कत वाटत नाहीं मोरोपतापर्यंतचे कवी जुन्या कथांवर एकाच तऱ्हेच कवित्व करीत आले मोरोपतानें त्याच कथा अगदीं नव्या तऱ्हेनें वर्णिल्या त्यानें मूळ ग्रंथातील उत्तम रचनेचीं स्थानें आपल्या काव्यात आणलीच आहेत शिवाय नव्या कोट्या आणि नवे विचारहि त्यांत भरपूर ग्रथिले आहेत ज्या संस्कृत ग्रंथातून त्यानें मूळ विचार घेतले आहेत त्यातील मूळच्या मार्गावर, कोट्यावर आणि अलंकारादिकावर त्यानें अनेक

ठिकाणीं ताण केली आहे त्यानें महाभारतादि मूळच्या विस्तृत ग्रथांतील कथा संक्षेपानें सांगितल्या आहेत. पण त्या तशा प्रकारें सांगतांना फार कुशलता दाखविली आहे मुद्रेश्वर, वामन, यांचीं कित्येक आख्यानें मोरोपंती आख्यानांहून श्रेष्ठतर वाङ्मयासारखीं आहेत. मोरोपताचीं शभर रामायणें म्हणजे उगाच काहींतरी भ्रमरचना नसून, प्रत्येकाचें रचनास्वरूप निरनिराळ्या प्रकारचें आहे. यामुळें भाषावृद्धीच्या दृष्टीनें तीं महत्त्वाचीं आहेत .... भाषासंवर्धनाच्या दृष्टीनें मोरोपताच्या कवितेनें मराठी भाषेचें मोठें कार्य केलें आहे अनुप्रास हा केवळ शब्दालंकार आहे पण तोच भाषा सजविण्यास व प्रसगविशेषीं तिला चटकदार आणि भारदस्त स्वरूप आणण्यास फार उपयोगी पडतो. असले प्रसग मोरोपतानें अगदीं जाऊ दिले नाहींत त्याच्या कवितेंत योग्य शब्द घालून आणि प्रसगानुसार वाक्यें आणि विचार याचा उपयोग करून केलेलीं रसभरित वर्णनें, अलंकार आणि मराठी कवितेचें मुख्य प्रशसनीय अग जें स्वाभावोक्ति यांचा भरणा फार आहे मोरोपताच्या काळापासून आतापर्यंत हरदासमडळीला आपला कीर्तनाचा थाट मनोहर बनविण्यास त्याची आर्या फार उपयोगी पडली आहे शब्दगौरव, भाषेची प्रौढी, आणि प्रसगानुसार रस, अलंकार याचा भरपूर उपयोग, काळ, प्रसग व्यक्ति, याना अनुसरून वर्णनें, थोडक्यात पुष्कळ अर्थ आणणें, आणि प्रसगाची मुख्य खुबी जाऊ न देणें, वर्णित पुरुषाचा आणि नायकाचा स्वभावविकास दाखविण्याची शैली, परिणामाचा परिपोष झालेला दाखवून नीतिविषयक पर्यवसानावर कथा आणणें हे मोरोपताच्या कवितेचे मुख्य गुण आहेत..... मोरोपत आपल्या काव्यातील नायकाचें योग्य प्रकारें स्वभावाविष्करण व स्वभावपरिपोष करून दाखविण्याचा चागला प्रयत्न करितो भीष्म, कृष्ण, अर्जुन, अभिमन्यु, द्रौपदी, राम, सीता, मारुती बिभीषण, इत्यादि सत्पक्षीय पात्रांचें त्यानें ठिकठिकाणीं योग्य वर्णन केलें आहेच, पण कर्ण, दुर्योधन, रावण इत्यादिकाचें स्वभाववर्णनहि त्यानें उत्तम रीतीनें केलें आहे कर्ण आणि दुर्योधन हे तर त्याचे आवडते योद्धे होते कर्णाचें शौर्य, स्वामिभक्ति, मित्रप्रेम व औदार्य आणि दुर्योधनाचें शौर्य, स्वाभिमान, चिकाटी, दिलदारपणा हे गुण मोरोपतानें उत्तम दाखविले आहेत. आर्याभारतांत कर्णपर्व हें अप्रतिम आहे असें पुष्कळांस वाटतें मुख्यत 'भीष्मभक्तिभाग्य' आणि 'केकावलि,' या काव्यांत मोरोपंतानें भक्तिरस मूर्तिमत उभा केला आहे" (रा मि जोशी. 'मराठी भाषेची घटना')

येथें घेतलेल्या 'भीष्माचें दुर्योधनास आश्वासन' या आर्याबद्ध उताऱ्यात दुर्योधनानें भीष्माचा केलेला अधिक्षेप व भीष्मानें त्यास आश्वासन, हा प्रसग वर्णिला आहे यामध्यें तुम्हाला सभाषणाचा अस्खलित ओघ दिसून येईल 'केकावलि' हें काव्य मोरोपताच्या स्वतत्र व लोकप्रिय अशा काव्यापैकीं एक आहे मोराच्या आवाजाला 'केका' म्हणतात कवीचें स्वत चें तेंच नाव असल्यामुळें, आपल्या मुखातून बाहेर पडलेल्या या काव्यातील श्लोकपक्तांना 'केकावलि' असें त्यानीं नाव ठेविलें पर्जन्यवृष्टीसाठीं मोर जसा टाहो फोडतो, तसा स्वत स भक्तरूपी मोर कल्पून यात कवीनें भगवतकृपेसाठीं टाहो फोडला आहे करुणरसाचा परिपोष करणारें पृथ्वीवृत्त योजून लिहिलेल्या या काव्यात, काव्यशास्त्रसपन्न, व्युत्पन्न पडिताचे विचार दृष्टीस पडतात तुकारामाच्या अभगाप्रमाणें यात जागोजाग भावनाचे उद्रेक दिसत असले, तरी त्यावरील बुद्धीची छायाहि लपत नाहीं यात, स्वतच्या स्थितीचें समर्थन करण्यासाठीं, कवीनें पौराणिक कथातील अनेक प्रसगाचा केलेला उपयोग, दुसऱ्या कोणत्याहि कवीच्या कवितेंत सापडत नाहीं

**देवनाथ** [इ स १७५४-१८२५] वऱ्हाडातील हे एक थोर दर्जाचे साधुकवि होऊन गेले यानीं आख्यानरचनेपेक्षा स्फुट पदरचनाच अधिक केली आहे "यांचीं पदें फारच मनोहर असून शब्दसौंदर्य, अर्थमाधुर्य, वचनकोमलता, अनुप्रास, अर्थलालित्य वगैरे असख्य गुणानीं तीं परिपूर्ण आहेत येथें घेतलेलें त्याचें 'मुरली' हें पद त्याच्या अनेक सुदर पदापैकीं एक आहे

भागवतांत श्रीकृष्णाच्या मुरलीवादनाचें व त्यावर लुब्ध होणाऱ्या गोपगोपींचें व धेनु-वत्सांचें मनोरम वर्णन आलें आहे जुन्या नव्या कवींनीहि श्रीकृष्णाच्या या मुरलीवर अनेक कविता लिहिल्या आहेत प्राचीन कवींपैकीं वामनपडितानीं, 'वेणु ती परिसता व्रजदारा । चालिल्या त्यजुनिया गृहदारा ॥' अशा याटाचें केलेलें वर्णन, त्याचप्रमाणें मध्वनाथाचें 'हरि तुचि मुरली धरयेणी' हें पद हीं अप्रतिम आहेत अर्वाचीन कवींपैकीं गोविंदाग्रज, माधव जूलियन् यांच्या मुरलीवरील कविताहि फार सुदर आहेत

## १. साधूची आत्यंतिक समता

पायीं जयाचिया ठायीं। वैषम्याची वार्ता नाहीं।
रिपु मित्रा दोहीं। सरिसा पाडु ॥
कां घरिचियां उजेड करावा। पारिखियां आंधारु पाडावा।
हें नेणेचि गा पांडवा। दीपु जैसा ॥
जो खांडावया घाव घाली। कां लावणी जयानें केली।
दोघां एकचि साउली। वृक्षु दे जैसा ॥
ना तरी इक्षुदंडु। पाळितया गोडु।
गाळितया कडु। नोहेचि जेवीं ॥
अरिमित्रीं तैसा। अर्जुना जया भावो ऐसा।
मानापमानीं सरिसा। होत जाय ॥
जो निंदेतें नेघे। स्तुति न श्लाघे।
आकाशा न लगे। लेपु जैसा ॥
साच लटिकें दोन्ही। न बोले जाहला मौनी।
जो भोगितां उन्मनी। आरायेना ॥
जो यथालाभें न तोखे। अलाभें न पारखे।
पाउसेविण न सुके। समुद्र जैसा ॥
आणि वायूसी एके ठायीं। बिढार जैसें नाहीं।
तैसा न धरीच कांहीं। आश्रयो जो ॥
हें विश्वचि माझें घर। ऐसी मति जयाची स्थिर।
किंबहुना चराचर। आपण जाहला ॥

ज्ञानेश्वर

## २. शुचित्व

म्हणे शुचित्व गा ऐसें। जयापाशीं दिसे।
आग मन जैसें। कापुराचें ॥
कां रत्नाचें दळवाडें। जैसें सबाह्य चोखडें।
आंत बाहेरी एकें पाडें। सूर्यु जैसा ॥

बाहेरीं कर्में क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला ।
इहीं दोहीं परीं आला । पाखाळा एका ॥
येऱ्हवीं तरी पांडुसुता । अंतर शुद्ध नसतां ।
बाहेरी कर्म तो सर्वथा । विटंबु गा ॥
मृत जैसा शृंगारला । गाढव तीर्थी न्हाणिला ।
कडु दुधिया माखिला । गुळें जैसा ॥
ओसगृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिंपिलें ।
कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥
कळस दिमाचे पोकळ । जळो वरील ते झळाळ ।
काय करूं चित्रिंर फळ । आंत शेण ॥
तैसें कर्म वरिचिलेकडा । न सरे थोर मोलें कुडा ।
नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगे ॥
म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभेल स्वभावें ।
वरि ज्ञान कर्में संभवे । ऐसें कें जोडे ॥
यालागीं बाह्य भागु । कर्में धुतला चांगु ।
ज्ञानें फिटला वंगु । अंतरींचा ॥
तेथ अंतर्बाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहलें ।
किंबहुना उरलें । शुचित्वचि ॥
म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरी दिसती फांकत ।
स्फटिकगृहींचे ढोलत । दीप जैसे ॥
येरवीं इंद्रियांचेनि मेळें । विषयांवरी तरी लोळे ।
परि विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥
भेटलेया वाटेवरी । चोखी आणि महारी ।
तेथ नातळे तियापरी । राहाटों जाणें ॥
पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ न शिजे ।
तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ति ॥
तया नांव शुचिपण । पार्था गा संपूर्ण ।
हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥

## ३ कवीश्वरस्तवन

### ( ओव्या )

॥ श्रीराम ॥ आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर । नातरी हे परमेश्वर । वेदावतारी ॥ १ ॥ कीं हे सरस्वतीचें निजस्थान । कीं हे नाना कळांचें जीवन । नाना शब्दांचें भुवन । यथार्थ होय ॥ २ ॥ कीं हे पुरुषार्थाचें वैभव । कीं हे जगदीश्वराचें महत्त्व । नाना स्थावें सत्कीर्तीस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्दरत्नांचे सागर । कीं हे मुक्तांचें मुक्त सरोवर । नाना बुद्धीचे वैरागर । निर्माण जाले ॥ ४ ॥ अध्यात्मग्रंथांची खाणी । कीं हे बोलके चिंतामणी । नाना कामधेनूंचीं दुभणीं । वोळली श्रोतयांसी ॥ ५ ॥ कीं हे कल्पनेचे कल्पतरु । कीं हे मोक्षाचे मुख्य पडिभरु । नाना सायुज्यतेचे विस्तारु । विस्तारले ॥ ६ ॥ कीं हा परलोकींचा निजस्वार्थु । कीं हा योगीयांचा गुप्त पंथु । नाना ज्ञानियांचा परमार्थु । रूपासि आला ॥ ७ ॥ कीं हे निरंजनाची खूण । कीं हे निर्गुणाची वोळखण । मायाविलक्षणाचें लक्षण । ते हे कवी ॥ ८ ॥ कीं हा श्रुतींचा भावगर्भ । कीं हा परमेश्वराचा अलभ्य लाभ । नातरी होये सुलभ । निजबोध कविरूपें ॥ ९ ॥ कवि मुमुक्षाचें अंजन । कवि साधकांचें साधन । कवि सिद्धांचें समाधान । निश्चयात्मक ॥ १० ॥ कवि स्वधर्माचा आश्रयो । कवि मनाचा मनोजयो । कवि धार्मिकाचा विनयो । विनयकर्ते ॥ ११ ॥ कवि वैराग्याचें संरक्षण । कवि भक्तांचें भूषण । नाना स्वधर्मरक्षण । ते हे कवी ॥ १२ ॥ कवि प्रेमळांची प्रेमळ स्थिती । कवि ध्यानस्थांची ध्यानमूर्ती । कवि उपासकांची वाढ कीर्ती । विस्तारली ॥ १३ ॥ नाना साधनांचें मूळ । कवि नाना प्रयत्नांचें फळ । नाना कार्यसिद्धी केवळ । कविचेनि प्रसादें ॥ १४ ॥ आधीं कवीचा वाग्विलास । तरी मग श्रवणीं तुंबळ रस । कवीचेनि मतिप्रकाश । कविस्वास होय ॥ १५ ॥ कवि व्युत्पन्नाची योग्यता । कवि सामर्थ्यवतांची सत्ता । कवि विचक्षणाची कुशळता । नाना प्रकारें ॥ १६ ॥ कवि कवित्वाचा प्रबंध । कवि नाना धाटी मुद्रा छंद । कवि गद्यपद्यभेदाभेद । पदप्रासकर्ते ॥ १७ ॥ कवि सृष्टीचा अळंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार । सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवी ॥ १८ ॥ कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण । नाना सुखाचें संरक्षण । ते हे कवी ॥ १९ ॥ कवि देवांचे रूपकर्ते । कवि ऋषींचे

महत्त्ववर्णितें । नाना शास्त्राचे सामर्थ्यातें । कवि वाखाणिती ॥ २० ॥ नस्ता कवींचा व्यापार । तरी कैंचा अस्ता जगदोद्धार । म्हणोनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी ॥ २१ ॥ नाना विद्या ज्ञातृत्व काहीं । कवीश्वरेंवीण तों नाहीं । कवींपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ २२ ॥ मागा वाल्मीकव्यासादिक । जाले कवीश्वर अनेक । तयापासून विवेक । सकळ जनासी ॥ २३ ॥ पूर्वी काव्यें होतीं केलीं । तरीच व्युत्पत्ति प्राप्त जाली । तेणें पढिता आगी बाणलीं । परम योग्यता ॥ २४ ॥ ऐसे पूर्वी थोर थोर । जाले कवीश्वर अपार । आता आहेत पुढें होणार । नमन त्यासी ॥ २५ ॥ नाना चातुर्याच्या मूर्ति । कीं हे साक्षात् बृहस्पती । वेदश्रुती बोलों म्हणती । ज्याच्या मुखें ॥ २६ ॥ परोपकाराकारणें । नाना निश्चय अनुवादणें । सेखीं बोलले पूर्णपणें । संशयातीत ॥ २७ ॥ कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसाचे वोघ लोटले । नाना सुखाचें उचंबळलें सरोवर हे ॥ २८ ॥ कीं हे विवेकनिधीचीं भांडारें । प्रगट जालीं मनुष्याकारें । नाना वस्तूचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ २९ ॥ कीं हे आदिशक्तीचें ठेवणं । नाना पदार्थासि आणी उणें । लाधलें पूर्वसचिताच्या गुणें । विश्वजनासी ॥ ३० ॥ कीं हे सुखाचीं तारूं लोटलीं । अक्षै आनंदें उतटलीं । विश्वजनास उपेगा आलीं । नाना प्रयोगाकारणें ॥ ३१ ॥ कीं हे निरंजनाची संपति । कीं हे विराटाची योगस्थिती । नातरी भक्तीची फळश्रुति । फळास आली ॥ ३२ ॥ कीं हा ईश्वराचा पवाड । पाहता गगनाहून वाड । ब्रह्मांडरचनेहून जाड । कविप्रबंधरचना ॥ ३३ ॥ आता असो हा विचार । जगास आधार कवीश्वर । तयासी माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३४ ॥

रामदास

## ४ नलराजा आणि हंस

शार्दूलविक्रीडित

पुण्य-श्लोक-नृपावलींत पहिला होवोनि जो राहिला ॥
तो राजा असता समस्त महिला जि ख्याति शेषाहिला ॥
व्यासोक्तें अवगाहिला बुधजनीं नाना-गुणीं गायिला ॥
जो मार्गे नळ तत्कथेघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥

इंद्रादिक वर अमतां, कशी नल-स्त्रीच होय दमयंती ॥
सुंदर सकळ-मधूंतें कशी मलमतीच होय दम-यंती ॥ २ ॥

दिंडी

कथा बोलूं हे मधुर सुधा-धारा ॥
होय श्रृंगारा करुण रसा थारा ॥
निषध-राजा नळ-नामधेय होता ॥
वीरसेनाचा तनय महा-होता ॥ ३ ॥
थोंगुणीनें जरि पूर्ण शीत-भानू ॥
नळा-ऐसा तरि कला-निधी थानूं ॥
प्रतापाचा जो न मावळे भानू ॥
तयासारीखा कोण दुजा मानूं ॥ ४ ॥

वसंततिलका

चंद्रासि लागति कळा उप-राग येतो ॥
गंगेसि भंग बहु पाण-उतार होतो ॥
जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला ॥
नाहीं समान नळ-राज-महा-यशाला ॥ ५ ॥

दिंडी

लोकबंधू जो होय रवी-ऐसा ॥
कुवलयाला जो सुखद चंद्र जैसा
सांग नोहे तो कुसुम-चाप तैसा ॥
निषध-रायाशीं तुल्य-रूप कैसा ॥ ६ ॥

शिखरिणी

कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ॥
कदा धन्वी जोडी परिवरिहि सोडी तरि कदा ॥
वि-पक्षाच्या वक्षावरि विवर-लक्षास्तव रणीं ॥
कळे राजेंद्राची त्वरित शर-संधान-करणी ॥ ७ ॥

शार्दूलविक्रीडित

जो पाहे सदसद्विचार हृदयीं जोपा जनाची करी ॥
जो पावे समयीं, विशेष गणिला जो पावनांभीतरीं ॥
सोपा जो सकळां द्विजा, सुमतिचा सोपा, सदा लाभतो ॥
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥ ८ ॥

जो धैर्यें धर-सा सहस्रकर-सा तेजें तमा दूर-सा ॥
जो रत्नाकर-सा गभीर, शिरसा भूपां, यशोहार सा ॥
ज्ञाना जो सरसावला, नव-रसांमाझारि शृंगार-सा ॥
शोभे तामरसाक्ष तो नळ रमा-नाथ स्तवूं फारसा ॥ ९ ॥

मालिनी

निषध-पति कथा हे जे सुधेनें जयंती ॥
परिसुनि दमयंती रंजली रंजयंती ॥
नवल मज न भासे चंद्र-वंशैकशाली ॥
नळ तरि घन माळी भीमकी हेचि झाली ॥ १० ॥

मान्यभारा

नळ-राज-कथा सुधाचि साजे ॥ दमयंती वर-वर्णिनी विराजे ॥
मिळणी उभयांसि होय जेथें ॥ अधिकारी अधिकानुराग तेथें ॥ ११ ॥

वसंततिलका

गंगा-तरंग सम जो निज देहवर्णी
भृंगापरी रुचिर कांति जयांशि कर्णी ॥
चंचाळ जो पवन सं गतिचीं सवे घे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ १२ ॥
जो अंबरीं उपळतां खुर लागलाहे ॥
तो चंद्रमा निज-तनूवरि डाग वाहे ॥
जो या धरान्तर कर्में धवलत्व ने घे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ १३ ॥

दिंडी

सर्व सेना भूपाळ निघालाहे ॥
दांत छंदी उद्यान एक पाहे ॥
रिघे तेथें मित्र सेवकांसि पाहे ॥
फौज सारी बाहेर उभी राहे ॥ १४ ॥
पनस जंबू जंबीर विविध निंबें ॥
कुंद चंदन माकंद सुदाडिंबें ॥
तुंग नारिंगी विकमलीं कदंबें ॥
वसति तेथें शुक-सारिका-कदंबें ॥ १५ ॥

वंशस्थ

लते-तळीं रुंद निरुंद कालवे ॥
गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती ॥
फुलांसवें भृंग-ततो तरंगती ॥ १६ ॥

आर्या

उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसाचे ॥
घोस असे फणसांचे षण्मासांचे कितेक वरसाचे ॥ १७

उपेंद्रवज्रा

तया वनीं एक तटाक तोयें । शुद्धंबळें, तामरसानपायें ।
निरंतरामंद मरंद वाहे । तपांतही वास्तव रिक्त नोहे ॥

द्रुतविलंबित

अमृतही पयही म्हणवीतसे ॥
उभय होय तसी रुचि वीतसे ॥
मधुर सारस तें जळ गा तसें ॥
मधुर सारस वास्तव गातसे ॥ १८ ॥

वसंततिलका

पीतां मरंद उदरंभर भ्रमरांचें ॥
जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ॥
जें पद्म तेथिल सहस्त्र-दळां धरी तें ॥
प्रत्यक्ष सूर्यकिरणांस विसाववीतें ॥ २० ॥

दिंडी

तया कासारीं राजहंस पाहें ॥
राजहंसांचा कळप पोहताहे ॥
तयासाठीं हे वापिकाच पोहे ॥
नळें केली हें कोण म्हणे नोहे ॥ २१ ॥
तया हंसांचे देह कांचनांचे ॥
पक्ष झळकती वीज जशी नाचे ॥
रंग माणिकसे चंचुंचे पदांचे ॥
जसे अधरींच भीम-कन्यकेचे ॥ २२ ॥

वसंततिलका

त्यांतील एक कलहंस तटीं निजेला ॥
जो भागला जळ-विहार विशेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ॥
पक्षीं तनू लपवि भूप तया पहातो ॥ २३ ॥
टाकी उपानह पदें अति-मंद टेंकी ॥
केली विचार वरि दौरहि, मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ॥
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥ २४ ॥

मालिनी

कलकल कलहंसें फार केला सुटाया ॥
फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपमिस मणि-बंधीं वेंढिला होय पंचू ॥
धरि मुकट जया तो काय सोडील पंचू ॥ २५ ॥

नदितर मग भेगें भेगळाले पळाले ॥
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ॥
कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ २६ ॥

रघुनाथ पंडित

## ५ मुक्तेश्वराची वर्णनशैली

पवित्र शीतलजल माथां मंदाकिनी । कधीं धरियली वन्ही ।
नवल काय !

गरुडारूढ मधुसूदन, हृदयीं वसे पूर्ण । कंठीं सर्पाभरण ।
नवल काय !!

सिंहावरी मोळंगल, अंकीं गिरिजा स्वस्थ । मारिला कुंजर दैत्य ।
नवल काय !!!

अहो लीलाविश्वंभरा, कृपामूर्ती जगदोद्धारा । तारिलें मुक्तेश्वरा ।
नवल काय !!!!

---

### प्रातःकाळचें वर्णन

शेष वेचतां अठरा घटिका । पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा !
कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे ॥
भार्गवाचार्य उदया येत । तव अपार म्रमूनियां पंथ ।
पुढें जान्हवीजळाचा वात । शीतल, मंद, पावला ॥
गगनसमुद्रीं मुक्ताफळें । अरुणचंचुनें कनकमराळें ।
वेंचोनि घेतां कळाकुशळें । नाहींच केलीं नक्षत्रें ॥
कीं व्योमनर्मदेमाजीं थोर । कार्तवीर्य सहस्रकर ।
तारा-बाणलिंगांचा भार । निवडोनि करी परौता ॥
कापडी चालिले तीर्थपंथें । " सोऽहमस्मि " चिंतिती ज्ञाते ।
भक्त स्मरती हरिहरातें । प्रेमभावें आवडी ॥

## अरण्याचें वर्णन

देखे प्रचंड महागिरी ॥ विशाळ पर्वतांचिया दरी ॥
जळें तुडुंबिलीं सरितासरीं ॥ समुद्रतुल्य अगाध ॥ १ ॥
तेथें आम्र निंबोल बेल ॥ कंवट कदंब मधु पिंपळ ॥
शिरस पलाश विशाळ ॥ न्यग्रोध वृक्ष वाढिन्नले ॥ २ ॥
ताळ हिंताळ शाल सरळ ॥ मंदार कांचन तमाळ निर्मळ ॥
पिचुमंद देवदार धवल ॥ अर्जुन वृक्ष अपार ॥ ३ ॥
खदिर कंटकीं हिंवर सादोडे ॥ हिरवे हिंगण व्याघ्राडे कुडे ॥
आंवळे पाचुंदे कंकाकडे ॥ करंज पांगेरे चौफेरी ॥ ४ ॥
वेणू कळंक चिंचिया जाळी ॥ औदुंबर फळले सुगंध फळीं ॥
तोरणी लागली घोंसाळीं ॥ खिरणिया डेंबुरणी पिंपरी ॥ ५ ॥
अर्क निवडुंग सदा मस्त ॥ मोडितां दिसे दुग्ध स्रवत ॥
जैसे प्रपंची विवेकरहित ॥ सुख बोलती विपर्यतें ॥ ६ ॥
ऐसिया वृक्षांची अचाट ॥ डांगें लागलीं घनदाट ॥
माजी निर्झरोदकाचे पाट ॥ सैरावैरा धांवती ॥ ७ ॥
मस्तकें उचलोनी दिनकर ॥ छाये रक्षिला अंधकार ॥
माजी श्वापदगणांचे भार ॥ सुखावले सुखवस्ती ॥ ८ ॥

---

## उपवनाचें वर्णन

तेथें चंदन पारिजात ॥ देवदार केतकी सुपुष्पित ॥
तुळसीवनें सुशोभित ॥ दवनेवनें घमघमिती ॥ १ ॥
सरिता सरोवरिंचीं पैं जळें ॥ पद्मगंधें सुशीतळें ॥
रातोत्पळें नीळोत्पळें ॥ सीतोत्पळें कनकाचीं ॥ २ ॥
तेथें राजहंस कारंडक ॥ चकोर सारस चक्रवाक ॥
करींद्र करिणी करिशावक ॥ स्वेच्छा करिती जळक्रीडा ॥ ३ ॥
मयूर गर्जती किंकोर ॥ कोकिळा गर्जती पंचमस्वरें ॥
षट्पद बोलती झुंकारें ॥ आणि कपोतें कूजती ॥ ४ ॥

सदा सर्वदा पुष्पी फळीं ॥ वृक्ष डवरती भूमंडळीं ॥
जैसा कुळीन ऐश्वर्यकाळीं ॥ विनयें भजे सर्वांतें ॥ ५ ॥
चहूं वेदांचीं पारायणें ॥ अनेक शास्त्रांचीं अध्ययनें ॥
रायें परिसोनि अंतःकरणें ॥ पापक्षयो भाविला ॥ ६ ॥
नदी मालिनी पवित्रजीवनी ॥ वाहे जैसी देवतटिनी ॥
तरंगलिंगें सुफेन सुमनीं ॥ सुपूजित शोभती ॥ ७ ॥

---

## दुष्यंताच्या राजसभेंतील क्रोधाविष्ट शकुंतला

म्हणे धन्य गा पुरुषोत्तमा ॥ उत्तम ऐसेंचि रक्षिती नेमा ॥
कर्मसाक्षी अन्तरात्मा ॥ तृप्त झाला या वचनीं ॥ १ ॥
मना नेणतां नाहीं पाप ॥ वन्ही नेणतां कैंचा दीप ॥
जीवनेंवीण वाढलें रोप ॥ पृथ्वीवरी कोठूनी ॥ २ ॥
जाणोनियां होय अजाण ॥ परिचय असतां पुसे "कोण"
हें तव अधमाचिं लक्षण ॥ तुज उत्तमा अयोग्य ॥ ३ ॥
ईश्वर आणि जोडिलें पुण्य ॥ स्मरोनि बोले यथार्थ वचन ॥
माझी साक्षी तुझेंचि मन ॥ तुझे अंतरीं देवाहे ॥ ४ ॥
यथार्थ जाणतां अंतःकरणीं ॥ अन्यथा प्रतिपादी जो वचनीं ॥
तेणें कोणनी पापकरणी ॥ केली नाहीं सांग पां ? ॥ ५ ॥
" मी एक जाणता सर्व सृष्टी " ॥ ऐसा अभिमान वाहसी पोटीं ॥
सकळ मूर्खांच्या शेवटीं ॥ कर्म करिसी त्यां तुल्य ॥ ६ ॥
पाप एकांतीं करूनि पाहीं ॥ म्हणनी कोणें देखिलें नाहीं ॥
इंद्रियदेवता आणि देही ॥ अंतर-पुरुष पहातसे ॥ ७ ॥
समर्थां देखतां जें करणें ॥ त्याप्रती पुढती 'नाहीं' म्हणणें ॥
तेणेंचि दंड पाविजे तेणें ॥ हें तंव प्रसिद्ध जाणसी ॥ ८ ॥
आदित्य वन्ही चंद्र पवन ॥ आकाश पृथ्वी आणि जीवन ॥
हृदय यम हे नव जाण ॥ वृत्त जाणती नराचें ॥ ९ ॥
उभय संध्या दिवस रजनी ॥ धर्मस्वरूप अंतःकरणीं ॥
शुभाशुभ घडे प्राणी ॥ तितुकें दृष्टि देखती ॥ १० ॥

इतुकें जाणें आपुल्या वर्मी ॥ प्रगट करितां जगाचे श्रोत्रीं ॥
चित्रगुप्ताचे लेखनपत्रीं ॥ साक्ष देऊनि लिहीती ॥ ११ ॥
वेव्हार न साधे साक्षीविण ॥ ऐसे बोलती जन अज्ञान ॥
साक्षी परमात्मा आपण ॥ सत्याकडे निर्धारें ॥ १२ ॥
कर्मसाक्षी हृदयस्थ ॥ क्षेत्रज्ञ आत्मा चैतन्यनाथ ॥
ज्याचेनि सत्क्रिये संतोषयुक्त ॥ सत्य शौच स्वधर्म ॥ १३ ॥
त्यातें दयाळ दंडपाणी ॥ धर्मराज कर जोडोनी ॥
आज्ञा मागे "म्हणे प्राणी ॥ उद्धरीन तव आज्ञा" ॥ १४ ॥
आतां असत्य पर्वतातळा ॥ उभा न राहें कुंभिनीपाळा ! ॥
वर पडेल वज्रशिळा ॥ परम अकीर्तिदोषाची ॥ १५ ॥
मस्तक होईल सहस्रभाग ॥ यया बोला न म्हणें व्यंग ॥
न्याय बोलतां उद्वेग ॥ विवेकिये न पावती ॥ १६ ॥
सकळ ऐश्वर्य घेऊनि भेटी ॥ पद्मा पावल्या पायें लोटी ॥
तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टीं ॥ काय लागे सांगणें ? ॥ १७ ॥
अदुष्टा सविनया पतिव्रता ॥ यौवनी सीतें त्यागी भर्ता ॥
तें सप्त जन्म भोगी व्यथा ॥ बाल्यवैधव्य स्त्रीदेहीं ॥ १८ ॥
अचल श्री, आरोग्य काया ॥ सुगुण पुत्र, पवित्र जाया ॥
बहु जन्में हरिहरांच्या पायां ॥ भजतां हें फळ पाविजे ॥ १९ ॥
विवेकबुद्धि न सोडी हृदया ॥ सर्वांभूतीं अभेद दया, ॥
बहु जन्में हरिहरांच्या पायां ॥ भजतां हें फळ पाविजे ॥ २० ॥
अपत्याचे आशेनें देखा ॥ अंड न भेदी पिपीलिका ॥
अमूल्य पुत्र वैदुर्य माणिका ॥ प्राहिक कां न होसी ? ॥ २१ ॥
"आत्मा वै पुत्र नामासि." ॥ आपण तोची पुत्रवेषीं ॥
जैसें दर्पण निजमुखासी ॥ आदर्नाव प्रतिबिंब ॥ २२ ॥
आतां दोनटिलिया वचना ॥ एकदां ऐकें नरभूषणा ! ॥
मी जातसें काश्यपाच्या कण्वाश्रमा सत्वेद ॥ २३ ॥
यया आत्मजा आपुलिया ॥ आदरें अंगिकारावें राया, ॥
समर्थ सद्देसि त्यागावया ॥ सत्य सत्य त्रिवाचा ॥ २४ ॥

याचिया कल्याण जन्मकाळीं ॥ वाचा झालीसे अंतराळीं ॥
सार्वभौम पृथ्वीतळीं ॥ अश्वमेध शतसंख्य ॥ २५ ॥
करील, अनेक महदाख्यानें ॥ वंश जयाचेनि अभिधानें ॥
भारत म्हणतील, पुराणें ॥ कीर्ति गातील ययाची ॥ २६ ॥
स्वर्गनायिकांमाजी श्रेष्ठ ॥ मेनिका नामें अतिवरिष्ठ ॥
तिच्या पोटीं तपोनिष्ठ ॥ विश्वामित्रऋषिवीर्यें ॥ २७ ॥
मज्ञयोनींत माझें जनन ॥ वंचूनि पिता सुहृज्जन ॥
तुज ओपिलें देहदान ॥ तें उत्तीर्ण झालासी ! ॥ २८ ॥

मुक्तेश्वर

## ६ सुदामवर्णन

जाहले हातपाय त्या नळ्या, नाडी दिसती वरि वेगळ्या, सुकलें मांस पडल्या वळ्या, नखीं वेष्टियल्या आंगोळ्या, उपोषणें चिरकाळें झालीं, सरकाळें अंगांचीं वाळुनि, देह तपें जाहलासे जर्जर, उभा अस्थींचा केवळ पंजर, तो भूनिर्जर, निगमगर्भ कृश दुर्भर, बोटीं दर्भ पवित्र, सदा मुखीं स्तव, महासूत्र सित गळां, परि निवर दोडका, तेंवि रोडका, धर्म जोडका, भडका जवळीं, नाहीं तथापि, भडकाटोही कोणि न करितां, तीन तेवड्या ओलांडुनियां चौथें मुक्तद्वार हरीचें, वेंघताचि देखिलें हरीनें लगबग लगबग अंकीं रुक्मिणी बसली ते पर्यंकीं लोटुनि उडी घालुनि, धांवत धांवत स्वयें येऊनि, ब्राह्मणचरणीं मस्तक ठेवुनि, दडवतानें मिठी घालुनी, उठी उठी म्हणताचि सुदामा चहूं भुजीं कडकडूनि आलिंगुनी, प्रेमबाष्प वारि तें लोचनीं, स्फुंदत स्फुंदत कडे घेउनी नाचत नाचत, पूर्ती नव्हे प्रियमूर्ति द्विजाची, निजासनीं बैसविली ॥ १ ॥ ब्राह्मण बैसविला पर्यंकीं, त्याचे चरण मळले पंकीं, ते ठेउनियां आपुले अंकीं, शक्ति मति नाहीं द्विजरंकीं, अंकितसा अवलोकित पंकज, अंकुरहस्तें शंकरसमान शंकर सुदामभूदेवाचे पाय चुरिले, जानु जंघा गुल्फपद कठोर भिंगुळिका, आर्ती अंगुळिका, नख मातीसह ते सांवरिले, हळू हळू पदतळ कुरवाळुनियां कंटक हरिले, सुगंध शीतळ निर्मळ जळ रखुमाई ओती कांचन पात्रीं, प्रक्षाळुनियां अंचळवस्त्रें पुसोनि निर्मळ हृदयीं धरिले, नेत्रीं लावुनि, मुकुट काढुनि,

मस्तकिं धरिले, चंदनचौकीवरि विस्तरिले, क्षणक्षणां अवलोकुनि प्रेमें बहु आदरिलें, स्वागतसुख शब्दांहीं भरिलें, धन्योहं कृतकृत्यमतानें मस्तकिं धरिलें, चरणोदक सहकुटुंब सेवुनि, दांडे वांसे स्तंभ शिंपिले, नवकेशरघनसारमलय पाटीरघनरसें भाळ चर्चिलें, सुखकारकशशिकिरणकरें उद्वर्तुनियां सर्वांग अर्चिलें, ब्राह्मणचरणीं तनुमनधन सर्वस्व अर्पिलें, दशांग गुग्गुळ, धूप कूपभर तूप, यूपसम तूलवर्तिका, सूपसविस्तर दीपमालिका धूप, लाविले अमूप, मध्यें भूप विप्रवर रूप, भव्य भरपूर आणि कर्पूर दिवे बहु परिमळ वाहे घव घव घव घव, ते तूपसाखर अमूप, वक्रवंजया, शुभ्र फेणिया, पंचखाद्य नैवेद्य हृद्य मृदु दुग्ध दधि, खाद्य पुरस्सर पद्य गद्य, अनवद्य सद्य सुख विद्यमान, शुभ नद्य जलाशय, मध्यमध्य पानियासहित श्रीआद्य हरीनें नैवेद्य समर्पूनि वेदवैद्य ब्राह्मणापुढें त्या भरूनि पराता खसा करुनि पृथु पात्रें निवेदिलीं ॥ २ ॥

अमृतराय

## ७ उपदेशपर फटका

लंडे गुंडे हिरसे टट्टु ह्यांची संगत धरूं नको । नरदेहासी येउन प्राण्या दुष्ट वासना धरूं नको ॥ ध्रु.॥ विकट वाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडुं नको ॥ संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरूं नको । चल सालसपण धरुनि निखालस खोट्या बोला बोलुं नको ॥ परधन परकामिनी पाहुनी चित्त भ्रमूं हें देउं नको ॥ अंगीं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको ॥ नास्तिकपणांत शिरुनि जनाचा बोल आपणा घेउं नको ॥ भली भलाई कर कांहीं पण अधर्म मार्गी शिरूं नको ॥ चाल ॥ मायबापावर रसूं नको ॥ दूर एकला बसूं नको ॥ व्यवहारामधीं फसूं नको ॥ चाल पू० ॥ परी उलाढाली भलभलत्या पोटासाठीं करूं नको ॥ लंडे गुंडे० ॥ १ ॥ वर्म काढुनी शरमायाला उणें कुणाला बोलुं नको । बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करूनि हेवा झटूं नको । मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्वभार हा वाहुं नको । एकाहूनि एक चढी जगामधिं थोरपणाला मिरवुं नको ॥ हिमायतीच्या बळें गरिबगुरिबांना तूं गुरकावुं नको । दो दिवसाची आइल सत्ता अपेश माथां घेउं नको । बहुत कर्जबाजारि होउनी बोज आपला दवडूं नको । स्नेह्यासाठीं पदरमोड कर परंतु जामिन होऊं नको ॥ चाल ॥ विद्या पैशाचा उचलुं नको । उगी तराजू तोलुं नको ॥ गहाण

कुमार्गे हुघडूं नको ॥ असल्यावर भिक मागुं नको ॥ चाल पू० ॥ नसल्यावर सांगणें कशाला गांव गुंडा भिड धरूं नको ॥ लंडे गुंडे० ॥ २ ॥ उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको ॥ यरी खुशामत शहाण्याचि ही मूर्खांची ती मैत्रि नको ॥ कष्टाची यरि भाजि भाकरी तुपसाखरेची चोरि नको ॥ आल्या अतिया मुठभर द्याया मागें पुढती पाहुं नको ॥ दिली स्थिती देवानें तीतच मानी सुख कधिं विटूं नको ॥ असल्या गांठीं धनसंचय कर सत्कार्यी व्यय हटूं नको ॥ आतां तुज ही गोष्ट सांगतों सत्कर्मा ओसरूं नको ॥ सत्कीर्ती नौबदिचा डंका गाजे मग शंकाच नको ॥ चाल ॥ सुविचारा कातरूं नको । सत्संगा अंतरूं नको ॥ द्वैताला अनुसरूं नको ॥ हरिभजना विसरूं नको ॥ चाल पू० ॥ गावयास अनन्तफंदिचे फटके मार्गें सरूं नको ॥ लंडे गुंडे० ॥ ३ ॥

अनंतफंदी

## ८ भीष्माचें दुर्योधनास आश्वासन

( नवमदिन युद्ध )

राजा कर्णासि म्हणे, "कृप शल्य द्रोण भीष्म हे आर्य ।
पाडुसुतांतें रक्षिती, कैसें सिद्धीस पावतें कार्य ? ॥ १

सांगेल कवण मज तुजवांचुनि या संकटीं उपाय सखा ।
मित्रमतिच हित करिती, मायचि म्हणती बळें, सुपायस खा." ॥ २

कर्ण म्हणे, "मी करितों कार्य तुझें, शक्य हें न अन्याय, ।
परि भीष्माकरवीं त्वा करवावा आजि शस्त्रसंन्यास. ॥ ३

कीं त्यासि तीर्थयात्रा सांग, वृद्धासि तीच उचिता कीं ।
रुचि अमृतीं सापडतां, रसिकीं घ्यावी कशास रुचि ताकीं ? ॥ ४

शस्त्रन्यास करावा भीष्में, कीं या बळांत न वसावा, ।
मग कार्यसिद्धि माझ्या हातीं, नलगेचि देव नवसावा " ॥ ५

हें कर्णमत परमहित ऐसें आलें मनासि राजाच्या, ।
शीघ्र रथावरि बैसुनि रात्रौ शिबिरास जाय आजाच्या. ॥ ६

वंदी पितामहा कुरुप जयंताचा पिता महादेवा ।
सर्वज्ञा सन्मान्या वरदा किंवा पितामहा देवा ॥ ७

कर जोडुनि दुर्योधन वदला, " अजि ! भरतकुलतिलक राया ! ।
भुलल्या मार्गे विजयश्रीदृष्टि पुढेंहि भुलतिल कराया. ॥ ८

आम्हां या पार्यांचा आश्रय, देवांसि जेंवि शक्राचा, ।
साक्षात्प्रताप तुमचा आश्रित शिव जेंवि विष्णुचक्राचा. ॥ ९

पांडव किती ? जिंकावे आम्हीं तुमच्या बळेंचि सुर सगळे, ।
युष्मद्यशासि लाजे विधु, ज्यापासूनि अमृत सुरस गळे, । १०

परि जय दुर्लभ आम्हां, झाले युद्धासि आठ वासर, हो !
हें नवल मराल म्हणे तृड्विकळ शिशूंसि आठवा सर हो. ॥ ११

ऐसें कां जी ! करितां शत्रुवधें जोडिलें स्वयश राखा, ।
त्याहूल अहितांसि मना आंतूनि म्हणा असंशय शरा खा. ॥ १२

बहुवीरक्षय झाला, आलें आठां दिसांत न यश मला, ।
शमले मद्बंधु बहु, न एकहि माद्रीपृथातनय शमला. ॥ १३

स्वीकृत कार्य मनावरि घ्या प्रभुजी ! पांडुवत्स मारा हो !
कीर्ति जसी रामाची लोकीं तुमचीहि तत्समा राहो. १४

जरि माझ्या द्वेषें कीं केवळ मद्भाग्य मंद, याकरितां ।
मरतीतें रक्षितसां कीं सदयपणें तुम्ही दया करितां. ॥ १५

तरि कर्णाला आज्ञा द्या, तो त्या पांडवांसि मारील, ।
मारीलक्षहि न तदिपुहुनि अधिक प्राणिजात सारील " १६

दुर्योधनोक्त परिसुनि जिरवी शांतनव रोषवेगातें,
जें असहनत्व खळमत पळही सुजना न पोपरे गा ! तें. ॥ १७

भीष्म म्हणे, " रे ! राया ! लागति वाग्बाण काळजाला कीं, ।
समरीं श्रम आतांही तुज वदतां फार काळ झाला कीं ? । १८

वाच्यावाच्य न जाणसि, काय म्हणावें तुला असों दे हें ? ।
दिधले स्वकार्यार्थ स्वप्राण, कथंपसे असों देहें. ॥ १९

पर्यास हें निदर्शन मोडुनि सर्वांसि मोहनें असें, ।
धर्में विराटनगरीं हिसकुनि नेलीं न हातिचीं शस्त्रें. ॥ २०

पर्याप्त तें निदर्शन, जगदीश्वर जेंवि नक्रमुक्त करी, ।
पळतां कर्णे, विजय सुरनायकवद्धा तुला विमुक्त करी. ॥ २१
कोण तयानें मारिल ज्याचें जगदीश परम तो कवच, ।
ज्याचें प्रमुखा बहु मत जैसें वृद्धासि चरमतोकवच. ॥ २२
जरि नारदादि मुनिनीं कथिलें, तूं जागमी परि न मोहें, ।
तरि जिंकिवासि त्यातें धरितासि मर्मी, मुखीं जरि नसो हें ॥ २३
हो पुरुष, वैर केलें, तेंमें युद्ध स्वयेंच कर जा, गा ! ।
मायेच्या भावाचा होता आतांचि कां न कर जागा ? ॥ २४
आम्हीं करूं, शिखंडी वर्जुनि, पांचालसोमकांतातें, ।
द्रवयूं यशःशशीतें सहृदयजनहृदयसोमकांतातें. ॥ २५
पांचाळसोमकांतें भाजीन प्रलयसूर्यसम, राजा !
करिन तसा गातिल कविवर यावचंद्रसूर्य समरा ज्या. ॥ २६
वधिन तयां मी, कीं मज वधितिल ते, काय आंग राखावें ? ।
अमृत मिळालें त्यागुनि सुज्ञें दाटूनि कां गरा खावें ? २७
भगवदितर सकळहि जन म्हणतिल, "तूं धन्य, भीष्मचापलते !" ॥
नीज सुखें, आहें मी तों करितिल काय करनि चापल ते. ॥ २८
श्रुत आहे आम्हां जो स्वकरें छेदी स्वमांस शिबिराजा ।
निववूं स्वदृष्टि उद्यां, श्रमलासि निजावयास शिबिरा जा. " ॥ २९

मोरोपंत

## ९ कांहीं निवडक केका

सदाश्रितपदा ! सदाशिवमनोविनोदास्पदा !
स्वदासवदमानसा ! कलिमलांतका ! कामदा ! ।
वदान्यजनसद्गुरो ! प्रशमितामितासन्मदा !
गदारिदरलंदकांबुजधरा ! नमस्ते सदा. ॥
पदाब्जरज जें तुझें, सकलपावनाधार तें,
अघाचलहि तारिले बहु तुझेंचि राधारतें; ।
अजामिळ, अघासुर, गजवधू, बकी, पिंगळा,
अशां गति दिली, उरे न तृण भेटतां इंगळा. ॥

दयार्द्र वत्सशील तूं, तरि न चातकां सेवकां
उणें किमपी; भाविकां उपगशील तूं देव कां ? ।
अनन्यगतिका जनां निरखितांचि सोपद्रवा,
तुझेंचि, करुणागंगा ! मन धरी उमोप द्रवा. ॥ १०

कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं;
तयांत अविशुद्ध मी, शलभ जेंवि दावानळीं; ।
मृगार्तपशुच्या शिरावरि वनीं उभे काकमे,
स्मरादि रिपु मन्मनीं; अहि न काळ भेकप्त कमे ? ॥ ११

तरेन तुमच्या बळें भवमहानदी; नाविका ?
तुम्हीच मग आवरास्तव मला सुदीना विका.
असे विदित यासही मज सदाश्रमींचा; करा;
दया, गुण पहा, सर्व मज सदा धर्मी चाकरा. ॥ १२

धनां, परिजना, घरीं तुमचिया उणें कायसें ?
न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें. ।
परि प्रभुहि संग्रहीं सकळ वस्तुला ठेविती;
गुणा न म्हणतां उणा, अधिक, आदरें सेविती. ॥ १३

" अतर्क्य महिमा तुझा, गुणाहि फार, बा ! हे, " विधी
श्रुतिव्रहि म्हणे सदा, स्तविल आमुची केंवि धी ? ।
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती;
स्तवार्थे सुखिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ? ॥ १४

कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते !
भले न वरिती स्तुतिप्रति, न जोडिती पाप ते; ।
गळो पद्धति ज्यांचिया तव गुणैकदेशक्रमें,
तिहीं तुजचि दाविता, भजति, हा ! तुला संभ्रमें. ॥ १५

म्हणोनि कविताभुला तुज समर्पितों; साजरी
नसे बहुतरी गुणी कनकपीतवासा ! जरी, ।
तरी न इतरा वरी, हरि ! करीं इला किंकरी;
मयूरहि निजाश्रमआग्रहविमुक्त, जैसा करी. १६

न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो,
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गी वळो, ।
स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो,
पुन्हां न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो. ॥ २४

दयामृतघना ! अहो हरि ! वळा मयूराकडे;
रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे; ।
असा अतिथिधार्मिकस्तुतपदा ? कदा सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे. २५

- मोरोपंत

## १० मुरली

तनों तनों त्रों तननन श्रीहरि हा वाजवी मुरली ॥ ध्रु० ॥
वृंदावनकुंजामाजी मधुरध्वनि उठला बाई ।
सुस्वर रव श्रवणीं पडतां गृहदार न सुचे कांहीं ।
अतिगुरुतर हे तमरजनी मेघाची पडली साई ?
अतिक्लिष्ट घाले मार्गी पडलें मी नादप्रवाहीं ॥ तनों० ॥ १

गीत संगित तान प्रबंधें रव मोहक त्या मुरलीचे ।
सुर किन्नर नर तल्लिन ते महिसहित अहिपति नाचे ।
वर्णेनी शिणल्या वाणी, न चले मुख वेद श्रुतीचें ।
शेषाच्या चिरल्या जिव्हा, अघटित गे ! करणें याचें. ॥ तनों० ॥ २

मंजुळ ध्वनि सुंदर बाई ! वाजवितां पडतां श्रवणीं ।
खग मृग अति तल्लिन झाले ते पिऊं विसरले पाणी ।
वृक्षाचें पत्र न हाले, रविरथु स्थिरावला गगनीं ।
सुर चकित पहाती अवघे मुकले रसअमृतपानीं ॥ तनों० ॥ ३

तृण भक्षिती ना त्या गाई, पक्ष्यांनीं त्यजिला चारा ।
वनिं व्याघ्र वृकादिक सारे हिंसेचा त्यजति दमारा ।
नरनारी स्तब्धचि अवघे मोडुनियां मोहपसारा ।
गर्जना मेघ न करिती, मुनि त्यजती आत्मविचारा. ॥ तनों ॥ ४

सुर असुरादिक स्थिर झाले, सांडुनियां सकळहि द्वंद्वा ।
अघटित हे लीला न कळे यतितां न वर्णवे वेदा ।
भांबावलिं शास्त्रें साही बोलतां न शकती शब्दा ।
देवनाथ प्रभु त्या गातो निजभावें नामप्रबंधा ॥ तनों० ॥ ५

देवनाथ महाराज

---

## स्वाध्याय

१. **साधूची आत्यंतिक समता.** सरिसां = सारखा, पाडु = योग्यता, पारखियां = परक्यास, तोडावया = तोडण्याकरितां; इक्षुदंडु = ऊस, साच = खरें, आरायेना = तृप्त होत नाहीं; पारुखे = रुष्ट होत नाहीं; बिढार = आश्रय, राहण्याची जागा.

यांत कोणकोणते दृष्टांत दिलेले आहेत ? या कवितेचें सरळ गद्यांत रूपांतर करा.

ज्ञानेश्वरानीं या कवितेंत ज्या प्रकारचा उपदेश केला आहे तशा प्रकारचा दुसऱ्या कोणा संतकवीनें केल्याचें तुम्हांस माहीत आहे काय ? तुमच्या वर्गशिक्षकाकडून माहिती मिळवा.

२. **शुचित्व.** दव्याडें = स्वरूप; चोखडें = शुद्ध; क्षाळला = धुतला, शुद्ध झाला; पाखळा = शुद्धवेला; वोसागृहीं = ज्या घरात कोणीहि रहात नाहीं अशा घरांत, ढिमाचे = मुलाम्याचे, शुडा = वाईट; वग = कलंक, चोखी = निर्मळपणा; मातळे = मनानेंही स्पर्शत नाहीं.

शुचित्व कशाला म्हणावयाचें असें ज्ञानेश्वरमहाराज सांगतात ? तुमच्या शब्दात लिहा

३. **कवीश्वरस्तवन** रामदासानीं लिहिलेली ही कविता अभ्यासिल्यानंतर अर्वाचीन कवींपैकीं एक महत्त्वाचे कवि केशवसुत यांची 'आम्ही कोण' ही कविता वाचा

५. **मुक्तेश्वराची वर्णनशैली.** हे सर्व उतारे मुक्तेश्वरानें रचिलेल्या महाभारतात आहेत. मुक्तेश्वराचें एक सुंदर चरित्र ल. रा. पांगारकर यांनीं

लिहिलें आहे. त्याचप्रमाणें ज. र. आजगांवकर यांनीं 'महाराष्ट्र-कवि-चरित्र' भाग १ ला यांत विस्तृत चरित्रात्मक लेख लिहिला आहे. तुमच्या शाळेच्या ग्रंथालयांतून हीं पुस्तकें आणवून जरूर वाचा.

८. सुदामवर्णन. श्रीकृष्णाचे भेटीस गेलेल्या, दारिद्र्यानें पीडलेल्या सुदामाचें वर्णन यांत केलें आहे. सूक्ष्मता हा या वर्णनाचा विशेष आहे.

९. कांहीं निवडक केका. केकावलींतून स्वतंत्रपणें सुमनता न बिघडेल अशा रीतीनें येथें केकांची निवड केली आहे.

१०. मुरली. 'मुरली' वर अर्वाचीन कवींनीं लिहिलेल्या कविता वाचा व त्यांची या कवितेशीं तुलना करा.

---

# २ चिंतनपर कविता

या विभागाला 'चिंतनपर' असें नांव दिलें आहे; याचें कारण यांतील कवितांत, कवि विचारमग्न असतां त्याच्या डोक्यांत जे विचार घोळले आणि हृदयांत ज्या भावना तरंगल्या त्यांचें प्रतिबिंब पडलेलें आहे. यांतील कविता कधीं आशा-निराशेच्या झगड्यांत सांपडलेली असेल, कधीं भक्तिरसानें ओथंबलेली असेल तर कधीं पूज्य भावनांनीं विनम्र बनलेली असेल; कधीं जगांतले अन्याय व दुःखें पाहून सहानुभूतीनें आर्द्र झालेली दिसेल, तर कधीं त्वेषानें मनांत चरफडत असलेली दिसेल.

११. शर सुटला भात्यांतुन. कवि अज्ञानवासी यांच्या इतर कवितांप्रमाणें याहि कवितेंत हृद्दिशीं चित्र उभें करणारे, गतीचा भास उत्पन्न करणारे व सहानुभूति निर्माण करणारे सूचक शब्द आहेत. 'थरकती,' 'चिंबचिंवाट' हे शब्द, आणि 'धावुन, धावुन धावेल किती,' ही ओळ कवितेंत कसा रस भरते तें पहा! तोकड्या ओळी, मोजके शब्द यांमुळें कल्पनांची मांडणी सुटक झाली आहे असें वाटतें आणि धावणाऱ्या मृगाबरोबरच कवीहि पळतो आहे असा भास होतो.

भात्यांतून शर धाडल्याबरोबर मृगाची तारांबळ उडाली, अजाण पक्ष्यांनादि यामुळें थरकांप सुटला. हरिणाचें पळणें वायां गेलें, बाण त्याच्या मिव्हारीं बसला — — —हिलें—पाहिलें कसचें, त्याची कल्पना आली मात्र, तोंच कवीच्या

डोळ्यांपुढें मृत्युरूपी शिकाऱ्याचें चित्र उभें राहिलें. त्याच्या विचारांची साखळी सुरू झाली; त्याला वाटतें, आमचेंहि भविष्य हेंच—

' लागला शर तो नच जोंवर
आम्ही रंगांत दंग तोंवर
गुतला जीव तिजोरीवर
पण नकळे पुढचा क्षण '

एखादें दृश्य पाहिल्यानंतर अशा तऱ्हेची विचारपरंपरा सुरू होणें हें चिंतनपर कवितेचें प्रमुख लक्षण आहे.

**१२. गौरीशंकर आणि मानव** पृथ्वीवरील अत्युच्च शिखर ( गौरीशंकर ) असलेला, पृथ्वीची लांबी मोजण्यासाठीं सृष्टिकर्त्यानें ठेवलेला गज अशी ज्याची कालिदासानें कल्पना केली आहे, हिंदुस्थानच्या उत्तरेचें संरक्षण करणारी एक अजस्र भिंत म्हणून ज्याला मानण्यात येतें, सिंधू, गंगा, ब्रह्मपुत्रा, यांचीं पवित्र उगमस्थानें व तीर्थयात्रेचीं ठिकाणें ज्याच्या देहावर आहेत, प्राचीनकाळापासून देवाचें निवासस्थान समजला गेलेला असा हिमालय पर्वत आणि क्षुद्र दुर्बल मानव यांची तुलना करणें प्रथम हास्यास्पद वाटतें धाडशी प्रवाशांनीं जगांतील बहुतेक पर्वतशिखरावर दीर्घ प्रयत्नानंतर आरोहण केलें याच धाडशी प्रवृत्तीनें प्रेरित होऊन गौरीशंकर गांठण्याचा अनेकांनीं केलेला प्रयत्न आजपर्यंत अयशस्वी झाला. विमानांतून गौरीशंकराला प्रदक्षिणा घालण्याचा यत्न, चिकाटीमुळें व आधुनिक शास्त्रीय ज्ञानाच्या जोरावर यशस्वी झाला खरा, पण या विरळ हवेच्या प्रदेशांत, जेथें पायाखालचे बर्फाचे डोंगर क्षणार्धांत तुटून पडतात, रौद्र झंझावात सुटून हिमाचा वर्षाव होतो, तेथें एक एक पाऊल पुढें टाकणें म्हणजे डोळ्यांत प्राण गोळा होतात. अशा ठिकाणीं, पायीं प्रवास करून कोणी जाऊ शकले नाहींत.

कांहीं लोक विचारतात कीं, या धाडसात काय अर्थ आहे ? पण हें धाडस उद्दामवृत्तीचें निदर्शक असतें सृष्टीच्या उदात्त, विराट् दृश्याचा परिणामच मानवी मनाला पवित्र करणारा असतो अशा लोकांच्या गिर्यारोहणांतील खरी मनोभूमिका काय असते हें कवीनें येथें उत्तम रीतीनें व्यक्त केलें आहे

आणि तसाच विचार केला तर, प्रचंड शक्तिमान् परमेश्वराजवळ जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या भक्ताची भूमिका हीच नाहीं का ? अशाच बिकट परिस्थितींतील धाडशी चिकाटीमुळें व लीन भावामुळेंच ज्ञानाचा लाभ व जीवाची उन्नति होते.

या कवितेंत दोन जाति आहेत.

झंपा ही जाति राजभा (–~–) अशा सात-गणांचें रूप आहे. गति आणि आवेश यांचा भास करणारी ही जाति आहे. गिरीराय या मिश्र जातींत ध्रुपद प्रमाणानंद (—प अष्ट मात्रिक)... ॥ सोळा मात्रा, व कडवें स्वर्गंगा (प।प।प। — + ॥) माना तीस असते.

१३. **बोगद्यांत.** घाटांतील एका बोगद्यांत मध्येंच गाडी उभी राहिली म्हणजे पुढचा मागचा उजेड असूनहि समोंवतीं अंधार दिसत असतो. या कधीं कधीं आडकून येणाऱ्या प्रसंगांवरून कवीनें गति कुंटलेल्या मानवी आयुष्यांतील विरट परिस्थितीचें चित्र रेखाटलें आहे. प्रत्येक कडव्यांत स्वतंत्र, स्वच्छंद जीवनाचें किंवा परिस्थितीचें वर्णन करून विरोधानें जीवावर सद्यःस्थितीचें किती दडपण पडलें आहे त्याचें वर्णन केलें आहे. एक नवीन रूपक, गोड चाल व शब्द, व लहानशी चित्रमालिका यामुळें ही कविता लोकांना आवडते.

१४. **ओढणी.** वा. भा. पाठक यांच्या ओढणी या अभंगसंग्रहांतील कांहीं अभंग तुम्हीं रसवंतीच्या पहिल्या भागात वाचले आहेत. या अभंगांची धाटणी प्राचीन तऱ्हेची असून त्यांत नवीन कल्पना, दृष्टांत तुम्हाला आढळतीलच, पण विचारांचा दृष्टिकोणहि स्वतंत्र व नवीन आहे असें तुम्हांला दिसेल.

देवाचें विस्मरण, जग मंगल वाटणें, भक्तीचा अभाव या वस्तुस्थितीचें समर्थन कवि कसें करतो हें पाहाण्यासारखें आहे. चित्तवृत्ति शांत ठेवून व ईश्वरावर भार टाकून केलेलें भक्तिगान परमेश्वराम रुचतें किंवा नाहीं अशी भीति कवीनें आर्तमनानें प्रकट केली आहे.

प्रामादिक भाषा, सरस कल्पना यांत कवीचें सरळ मन प्रतिबिंबित झालें आहे.

१५. **गुन्हेगार.** ही सामाजिक अन्याय दाखविणारी एक कविता आहे. गुन्हेगार म्हणजे समाजाच्या नियमाना उल्लघून वर्तन करणारा मनुष्य. शिक्षा भोगूनहि पुन्हां वर्तन सुधारलें असलें तरी त्याला पूर्ववत्, जगांत राहतां येत नाहीं. समाजाच्या या निष्ठुरपणामुळें एकदां गुन्हेगार ठरलेला माणूस कायमचा गुन्हेगार व पतित समजला जाऊन त्याचें पुढील सर्व आयुष्य फुकट जातें. समाजांत कलंकित ठरलेल्या अशा मनुष्याच्या भावना या कवितेंत मांडल्या आहेत.

१६. **मातृभूमीस वंदन.** यशवंत कवीच्या 'बंदिशाळेंतील' हें पद आहे. एक बालगुन्हेगार रेफॉर्मेटरी स्कूलमधून सुटल्यावर, त्याला समाजांत कुठेंहि थारा

र मिळाल्यामुळें, व जावें तेथें, अवहेलना व उपहास होत असल्यामुळें वैताग येऊन देशत्याग करण्याच्या हेतूनें, युद्धाला निघालेल्या सैन्यांत दाखल होतो. महायुद्धावर जाण्यासाठीं देशाचा किनारा सोडतेवेळीं त्याची झालेली मनःस्थिति या गीतात वर्णिली आहे.

१७. खिडकींतून. या कवितेचें परीक्षण अनेक दृष्टींनीं तुम्हांला करता येईल. या कवितेंत वर्णिलेली शोभा किती मोजक्या व समर्पक शब्दांनीं केली आहे तें पहा. आभाळांतील मेघाचे रंग व आकृति, नारळीच्या झावळ्यांचें सळसळणें, चाफेकळीचें डुलणें, दिगंतराला जाणाऱ्या पक्ष्यांचे थवे हे देखावे कोणत्या शब्दांत वर्णन केले आहेत तें पहा. बाहेरच्या जगाची शोभा पहाण्यासाठीं कवि खिडकींत बसला असून, मन उदास झालें आहे, कांहींतरी मनाला हुरहुर लागली आहे म्हणून खिडकींतून बाहेर पहात आहे. खिडकींतून दिसणाऱ्या त्या त्या वस्तूंचें वर्णन करीत आहे. "आपल्याप्रमाणेंच याच्याहि मनाला काहींतरी जाळतें आहे. हृदयातली हुरहुर त्याच्या कम्पण्यात, बेचैन डुलण्यांत दिसत आहे. माझ्या सैरावैरा धांवणाऱ्या विचाराप्रमाणें हे पक्षीसुद्धां कसली तरी ओढ लागल्यामुळें दिगंतरास जात आहेत," असें त्याला वाटतें. आपल्याप्रमाणेंच सर्वांची स्थिति पाहून क्षणभर याला विरंगुळा वाटतो. शेवटच्या कडव्यांत कवीच्या असहाय्य स्थितीचें किती सुंदर वर्णन केलें आहे!

कोंदटलेल्या परिस्थितींत राहणाऱ्या जिवाला असे समाधानाचे प्रसंग लाभतात म्हणूनच जीव तगविणें शक्य होतें

## ११ शर सुटला भात्यांतुन

, शर सुटला भात्यांतुन
मृग पळे जीव घेऊन
हिरवें तृण खालती कोवळें
होतें कोठें अतां उगवलें·
जीव भुकी रानचे रंगले
पण मुखीं घांस कोंडुन.
चाळपांखरें झाडावरती
चित्र खालचें बघुन चरकती

पक्षातिल सावरती शक्ती
चिवचिवाट भेदी मन ३
वाऱ्यावरती जरि त्याचि गति
धावुन धावुन धावेल किती
शर आला यच–फुटली छाती
चळचळा कांपतें वन
लागला शर तो मच जोवर
अन्ही रगात दग तोंवर
गुंतला जीव तिनोरीवर
पण नकळे पुढचा क्षण
शर सुटला भात्यातुन
मृग पळे जीव घेउन ४

अज्ञातवासी

## १२ गौरीशंकर आणि मानव



( काही वर्षांमागें गौरीशंकर गाठण्याचा काहीं धाडसी, ज्ञानपिपासु इसमांनी दोनदा प्रयत्न केला ! दोन्ही त्यांना दगावले निसर्गाचें अद्यापि अज्ञात असें अमर्याद स्वरूप व मानवाची तें जाणण्याची अमर्याद तृष्णा यांचें हें उत्तम उदाहरण आहे

पहिल्या भागांत वरवर चढून जवळ येणाऱ्या मानवास गौरीशंकर तिरस्कारानें खालीं लोटीत आहे. दुसऱ्या भागांत मानव नम्रपणें पण निश्चयानें त्याला उत्तर देत आहे.)

—१—

(जाति, क्षपा)

थांब, खालीं उतर, परत जा परत जा !
क्षुद्र जीवा तुझ्या गर्व वायां ॥ ध्रु. ॥
मंत्रदर्शी मुनी आदरें मज नमुनी
सिद्ध झाले उप सूक्त गाया १
या हिमस्थण्डिलीं भानुकिरणावली
कांपते होत जड बधिर काया २
वायु चढतां वरी गुदमरे अंतरीं
घसरुनि खालतीं धरित पायां ३
वरुण अभिषेक धरि, आरती वीज करि
माळ घालीं गळा इंद्रराया ४
सागराधीश तो चळचळां कांपतो
खंडणी धाडितो तोषवाया ५
क्षुद्र तूं ? मूढ तूं ? ज्ञानदर्पांध तू !
उतर जा ! हट्ट कां धरिशी वायां ? ६

—२—

(जाति-गिरिराय)

कां आडविशी गिरिराया, रे ॥ ध्रु ॥
देह आमुचा जावो राहो, आलों तुज भेटाया १
ज्ञानमहोदधि अफाट भरला उतरलोंत पोहाया २
दुर्बळ देहांतिल दुर्दम मन सिद्ध विश्व जिंकाया ३
अनंत अज्ञाता उकलाया अनंत आकांक्षा या ४
खुलें कुणा आम्हांस जगाचें परतविशी का वायां ? ५
जिकडे तिकडे ज्ञानरूप परमेश खुणवितो " या ! या ! " ६
चढेल कोणी पडेल, आम्ही सदा तयार मराया ७
सोड हिमाळें खुशाल आतां, आलों तुज गांठाया ८

विठ्ठलराव घाटे

## १३ घोगयांत

कुठवर ही थांबणार घोगयांत गाडी !
कां न तातडी करुन जाइ ही अघाडी ?
पूर्विचें नि पुढचें तें
विश्व रम्य मज दिसतें
आज लाभलींत इथें
मात्र हीं खुराडीं !
स्नेहाचे विमल किरण
तेथ देति आलिंगन
तिमिर येथ थयथयून
मारितो कुऱ्हाडी.
लुटुनि तेथ सुमनगंध
वाहि उरीं पवन मंद
स्थळ हें परि धूरबंद
जेविं तीं धुराडीं.
मायेची करि छाया
देह फळें सेवाया
कटि-खांदीं क्रीडाया
येथ न ती झाडी.
खाउनि अंधार धूर
खडक मात्र भवतिं क्रूर
पघतां दडपेच ऊर
गोठवे धडाडी.
करि न चालका, उशीर;
कळ फिरवी, ने बाहिर.
जावयास मी अधीर
आपुल्या बिन्हाडीं.

यशवंत

## १४ ओढणी

चरावया बैल रानांत निघाले
        क्षण विसरले—धन्यास ते.
आल्हाद्यांत मन्त्र झुंजाया लागले
        क्षण विसरले—देहभान.
रांगतें बाळ हें अंगणांत आलें
        घरचें कुठलें—भान त्या ?
संसारांत देवा, मला तूं सोडिलें
        स्वाभाविक झालें—विस्मरण.

✿

विहिरींत राहे पारवा घुमून
        काय तो स्व-स्थान—निंदितसे ?
वेलीवर डोले पुष्प मनोहर
        बोले का 'निःसार—माझें जिणें' ?
पक्षी वृक्षावर गोड गीत गाई
        शाप काय देई—तरूस तो ?
सुंदर जगांत देवा माझा वास
        अमंगल त्यास—कसें बोलूं ?

✿

सर्वच पुष्पांचें सुरेख स्वरूप.
        सर्वांत सौरभ—काय पण ?
सर्वच वृक्षांना शाखा आणि पर्ण
        सर्वांस का पण—घनछाया ?
सर्वच सरिता तुडुंब भरल्या
        सर्वच का झाल्या—हितकारी ?
        मानव असती सर्वेश
        परी एखाद्यास—देवपण.

✿

थोडका खेचावा बाद आधीं मागें
सुटे तेव्हां निघे—भरधांव.
जळौघ छोटावा थोडकासा मागें
वेगें तोंच लागे—वहावया.
धनुष्याची दोरी जितकी आखडे
तितका तो सुटे—शर वेगें.
देवा तुला गाया मन मागें घेई
स्थिती हीच देई —स्फूर्ति मज

अनेक वृक्षांनीं शोभे वनराई
अनेक रत्नांहीं—रत्नाकर.
नाना कल्पनांनीं शोभे महाकाव्य
राजवाडा भव्य—दालनांनीं.
पादपांनीं येई भूगोलास शोभा
तरी अंतरिक्षा—विहगांनीं.
ग्रहगोल यांनीं होई विश्व भव्य
किन्नर गंधर्व यांनीं—स्वर्ग.
माझ्या चित्तांतील अनेक कलांहीं
देवा तुझें होई—एक गान.

अस्तोदयापूर्वी रवीचें स्वरूप
राहतें धरून—विशालता.
भरती ओहटी व्हावयाचे पूर्वी
गंभीरता धरी—रत्नाकर.
झालें आणि आतां व्हावयाचें वादळ
स्थिर भूमीतल—म्हणून हें.
देवा तुझ्या गानीं होतें चित्त शांत
उदय कीं अस्त—समजूं हा ?

वेलीवर पुष्प झालें आहे म्लान
 कांहीं बीजावीण—त्यांत नाहीं.
आटलें नदीचें सगळें जीवन
 तेथें पात्राविण—कांहीं नाहीं.
गेल्या पर्ण-शाखा सरूला टाकून
 एका खोडावीण—त्या न कोणी.
गेलें देवा माझें जीवीत मुयून
 एका आशेवीण—तुझियाच.

ॐ

गाभार्‍यांत ध्वनी क्षणैक काढिला
 घुमत राहिला—कांहीं काळ.
कानावर येई लकेर सुरेल
 राही अल्पकाळ—श्रुतींत ती.
खग उडे गात सरितेवरून
 कांहीं काळ स्वन—पाशीं घुमे.
सर्वस्व खर्चून गातों देवा गान
 होई अल्प पण—रंजन का?

ॐ

वाटतें थोडकें गातांना थांबावें
 तुझ्या आयकावें—चाहुलीस.
कार्यांत निमग्न होतां पहुडावें
 स्वप्नांत पहावें—तुझें रूप.
आवडीचा सारा पसारा लोटून
 तुज आलिंगन—दृढ द्यावें.
विनंती परंतु—हातचें सोडितां
 मी तुज मुक्तां—होऊं नये.

ॐ

आहे नाहीं अर्थ वाळूच्या घोळींत
नाहीं कां हृद्गत—त्यांत त्यांचें.
विकसित पुष्पीं गंध आहे नाहीं
हृदय का नाहीं—खुलें त्याचें.
सुख दे वा न दे वाऱ्याची ल्हर
मोकळें अंतर—तरी तिचें.
माझ्या गानीं देवा आहे नाहीं अर्थ
पण का न त्यांत—अंतरंग ?

वा. भा. पाठक.

## १५ गुन्हेगार

[ जाति प्रणयप्रभा. ]
सोडणार का हो मज इथुनी ?
द्या सजा आणखी वाढवुनी !
गुन्हा एकदां घडला—केला
कलंक त्याचा माथां बसला
तो पुसतां ये तुम्हां, न कळे !
मुक्तीचा अर्थ मग काय जनीं ?
द्या सजा आणखी वाढवुनी !
चोरी केली ज्यांच्याकरितां
ओळखतिल नच तेही आतां
लाजतील मम नात जोडितां
मी कैदी, नच माणुस कुणी !
द्या सजा आणखी वाढवुनी !
गुन्हेगार जगिं कुणीं निर्मिला ?
प्रमाद पहिला न जयें क्षमिला,
शिक्षेसाठीं तुरुंग सृजिला,
माणुसकी असुनी हिरावुनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

प्रकाश मजला जग नाकारिल !
छाया–शांति तियली जाळिल !
बसली जागा दवहि सोडिल !
लागतील दारें मज बघुनी !
द्या सजा आणखी वाढवुनि !
घरी प्रभावळ ही पापांची
सोबत सारी अपराधांची
पाप न येथें पापा जाची
दुष्कर्म भार निज विसरोनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !
भिंतीनों, मज कुशींत दडवा,
थंड शिळांनों, अंकीं निजवा,
बेड्यांनों, गाऊन जोजवा,
जग–सारा पडुं द्या नच सुकुनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

कान्त

## १६ मातृभूमीस वन्दन

[ चाल–बहु असोत सुन्दर. ]
वन्दन तुज मायेभूमि ! हे अखेरचें
न कळे तव दर्शन कधिं फिरुन व्हायचें !
विसकटली बसवावी फिरुन ती घडी
तव कार्यी झिजवावी शक्य तो कुडी
आशेची फोल परि भ्रमुनि यातडी
देशोधडि लागे ही आज बापुडी
आंचवलों जननीच्या सौख्यकारणा
आचवलों तेंवि तुझ्या क्लेशवारणा
काय म्हणूं परिसमासि ही तुला रुचे ?
वंदन तुज मातृभूमि हें अखेरचें ॥ १ ॥

यश मळलें उजळाया पिरत त्यांमधीं
तळमळलों धडपडलों निशिदिनीं किती
परि भूवरि पाय कुणी टेकु ना दिला
काकांचे जेवि थवे झपटत्या पिला
काडीचा आधारहि मानिला महा
झाली परि फसवणूक नित्य दुस्सहा
मान उंच करु पाहे कोंवळी कळी
धडगत ठरेल तिची केंवि वादळीं
झिडकारुनि दिधलें जें ठेकरू तुवां
टाकलास ज्याचा तू तोडुनी दुवा
तरि त्याच्या नच ढळली अश्रु नेत्रिंचे
वदन तुज मातृभूमि हें अखेरचें ॥ २ ॥

मरणाच्या दाढेमधिं घालतों जरी
मरणाच्या भीतिचा न लेशही उरीं
मरणाच्या खाईमधिं आयु कंठलें
मरणाचें काय तया भुजग-बाहुलें ?
ग्रीष्माचा दाह काय वाळल्या तृणा ?
राखेला जाळिल का अग्नि तो पुन्हा ?
परि तुझी न भेट मला व्हायची पुढें
ह्या शल्यें हें तुटतें मात्र आंतडें
मिळणार न अन्य शयन गे त्वदंकिचें
वदन तुज मातृभूमि हें अखेरचें ॥ ३ ॥

यशवंत

## १७ खिडकींतून

ये सख्या ! इथें बैसुन
पहा या क्षणैक खिडकींतुन
हीं दृश्यें निरखुन
येथुनी सख या खिडकींतुन

नभाच्या अफाट फलकावर
पार्श्वभू बहुरंगी सुंदर
आलेख मनोहर मेघांचे शीवर
दान सानसा अंश तियेचा दिधला मजलागुन
पहा, तो नीट सख्या निरखुन !

या नील नभोमंडळीं
अस्फुट पक्षपुरी रेखिली
वरती सुफलावली
डोलती बघ पुढती माळी
स्वदेहें वाळ्यावर सावल्या—
कराया वात्सल्यें वाकल्या,
ऐक या सळसळती झावळ्या,
अविरत त्यांची मर्मर ही का हुरहुर हृदयांतली
जशी मी कण्हतों ही आपली !

या चंपकशाखेवरी
झुले बघ ही कलिका सुंदरी
ही सौरभ–सुख मंजिरी
कशी बघ हलते खालीं वरी
हृदींच्या कटु-मधुर भावना
करोनी मुग्ध ज्या नर्तना
दुखविती सतत माझ्या मना
तशा जाळिती विच्या जिवाला बहुधा काहीं तरी
दिसेना चैन तिला अंतरीं !

त्या दूर दिगंतांतरीं
तरंगत भुरक्या ठिपक्यांपरी
या अपांग नीलांबरीं
दिसे का अंशुक कांहीं दुरी ?

ते विहंगमांचे थवे
उडोनी जाती भराऱ्या भरें
अशुं विचार माझे मरे
सविताच्या छाया पडल्या दिसती मग त्यांवरी
थोडकें अन्तर कोठें दुरी !

या इथेंच मी पहुडुनी
पहातों हेंच सदा निरखुनी
अनिमीलित लोचनीं
सारें हेंच वदे अनुदिनीं
सङ्केत अम्हांमधिं थमे,
तो शब्दांविण कळतसे
उपचारामार्गी दिसे,
दीड वितीच्या खोलीमाजी म्हणुन अगा विसरुन
गुंगतों पहात खिडकींतुन !

के. नारायण वाळे

## स्वाध्याय

१२. गौरीशंकर आणि मानव. हिमालयाचीं, आल्प्स पर्वताचीं वर्णनें ज्यांत आहेत अशीं प्रवासवर्णनें वाचा.

गौरीशंकर व नंदादेवी यांचीं उच्च शिखरें चढून जाण्यासाठीं आतांपर्यंत कोणी व कसे प्रयत्न केले, यांची वर्तमानपत्रांवरून मिळविलेली माहिती शिक्षकांकडून मिळवा.

शिखरावर जाण्याचा प्रवासी इतका अट्टाहास का करतो याचें कवीनें दिलेलें कारण सांगा.

दोन पात्रांच्या मनःस्थितीचें वर्णन करणारें हें नाट्यगीत आहे. याचा एक नाट्यप्रवेश लिहा.

१४. ओढणी. मनुष्याचें देवपण म्हणजे काय? शांतचित्त व एकुलती एक आशा यांना दुसऱ्या उपमा सुचवा.

१५ गुन्हेगार. या कवितेची जाति प्रणयप्रभा (प्रबालानंद) ही आहे. पादाकुलकाच्या काहीं ओळी, नतर बालानंदाची एक ओळ व ध्रुवपद अशी या जातीची रचना असते

बालगुन्हेगाराची स्थिति वर्णन करणारें यशवंत कवीचें खंडकाव्य 'बंदिशाळा' यातील निवडक उतारे पहा.

तुरुंगाचा शोध लावणारा मनुष्यच गुन्हेगार असें कैद्यास कां वाटतें ?

जग-वारा = जगाचा वारा पडणें हा वाक्यप्रयोग येथें चुकीचा असल्यास योग्य वाक्प्रचार सांगा

१६ मातृभूमीस वंदन या कवितेतील मुलगा कशा परिस्थितींत शेवटचा प्रणाम करतो तें 'बंदिशाळा' काव्याच्या आधारानें शिक्षकांकडून समजावून घ्या

ही कविता मातृभूमी-गीत नाहीं याचें कारण सांगा

कावळ्याचें पिल्लू, कोवळी कळी, आणि राख या शब्दांनीं कोणत्या कल्पना मांडल्या आहेत व त्यांचा कवितेंत कसा उपयोग केला आहे तें सांगा

गुन्हेगाराचें तुरुंगाबाहेरील आयुष्य मरणाहून वाईट असतें असें कवी कां म्हणतो ?

१७. खिडकींतून. के ना काळे यांच्या 'सहकार-मंजिरी' या संग्रहांतून इतर कविता वाचा मेघांना यक्षपुरी असें कवी का म्हणतो ?

बायरन कवीकृत एकांतवासात कोंडलेल्या (Prisoner of Schillon) शिलॉंचा कैदी या कवितेचें रूपांतर वाचा

'निसर्गापासून मानव दूर गेल्यामुळें सुखदु:खें निर्माण होतात, निसर्गाशीं तादात्म्य पावण्यांत खरें सुख आहे' या कल्पनेच्या इंग्रजी कविता शिक्षकाकडून समजावून घ्या

हे शिंगमाथे यथे
उडोनी जाती मळण्या गर्वे
वर्णु विचार माझे नवे
अखिलाच्या जपा पडल्या दिसती मज त्यांवरी
जोडतें अन्तर कोठें दुरी !

या इथेंच मी पहुडुनी
पहातों हेंच सदा निरखुनी
अनिमीलित लोचनीं
सारखें हेंच वर्षे अनुदिनीं
सहकंप अम्हांमाधि वसे,
तो शब्दांविण कल्पने
उपचारामाजीं दिसे,
दीड वितीच्या खोलीमाजी म्हणुन जगा विसरुन
गुंगतों पहात खिडकींतुन !

के. नारायण फळे

## स्वाध्याय

१२. गौरीशंकर आणि मानव. हिमालयाचीं, आल्प्स पर्वताचीं वर्णनें ज्यात आहेत अशीं प्रवासवर्णनें वाचा.

गौरीशंकर व नंदादेवी यांचीं उच्च शिखरें चढून जाण्यासाठीं आतांपर्यंत कोणी व कसे प्रयत्न केले, यांची वर्तमानपत्रांवरून मिळविलेली माहिती शिक्षकांकडून मिळवा.

शिखरावर जाण्याचा प्रवासी इतका अट्टाहास कां करतो याचें कवीनें दिलेलें कारण सांगा.

दोन पात्रांच्या मन:स्थितीचें वर्णन करणारें हें नाट्यगीत आहे. याचा एक नाट्यप्रवेश लिहा.

१४. ओढणी. मनुष्याचें देवपण म्हणजे काय? शांतचित्त व, एकुलती एक आशा यांना दुसऱ्या उपमा सुचवा.

१५ गुन्हेगार. या कवितेची जाति प्रणयप्रभा (प्रबालानंद) ही आहे पादाकुलकाच्या काही ओळी, नतर बालानंदाची एक ओळ व ध्रुवपद अशी या जातीची रचना असते

बाल्गुन्हेगाराची स्थिति वर्णन करणारें यशवत कवीचें खंडकाव्य 'बंदिशाळा' यांतील निवडक उतारे पहा

तुरुगाचा शोध लावणारा मनुष्यच गुन्हेगार असें कैद्यास कां वाटतें ?

जग-वारा=जगाचा वारा पडणें हा वाक्यप्रयोग येथें चुकीचा असल्यास योग्य वाक्प्रचार सागा

१६ मातृभूमीस वदन या कवितेंतील मुलगा कशा परिस्थितीत शेवटचा प्रणाम करतो तें 'बंदिशाळा' काव्याच्या आधारानें शिक्षकाकडून सम जावून घ्या

ही कविता मातृभूमी-गीत नाहीं याचें कारण सागा

कावळ्याचें पिन्ड, कोवळी कळी, आणि राख या शब्दांनी कोणत्या कल्पना माडल्या आहेत व त्याचा कवितेंत कसा उपयोग केला आहे तें सागा
गुन्हेगाराचें तुरुगाबाहेरील आयुष्य मरणाहून वाईट असतें असें कवी कां म्हणतो ?

१७ खिडकींतून के ना काळे यांच्या 'सहकार-मंजिरी' या सग्रहांतून इतर कविता वाचा मेघाना यक्षपुरी असें कवी कां म्हणतो ?

बायरन कवीकृत एकांतवासांत कोंडलेल्या ( Prisoner of Schillon ) शिलॉंचा कैदी या कवितेचें रूपातर वाचा

'निसर्गापासून मानव दूर गेल्यामुळें सुखदुःखें निर्माण होतात, निसर्गाशी तादात्म्य पावण्यांत खरें सुख आहे' या कल्पनेच्या इग्रजी कविता शिक्षकांकडून समजावून घ्या

# ३ सुनीत (रत्नावली)

इंग्रजींतील सॉनेट या काव्यप्रकारावरून हा प्रकार मराठींत आला या प्रकाराचें मूळ सुरवात, इटाली देशांत तेराव्या शतकांत, दांटे व पेट्रार्क या जगद्विख्यात कवींनी केली त्याचें अनुकरण इंग्लंडांत होऊन, सोळाव्या शतकांत मिल्टन व शेक्सपियर यांनी हा काव्यप्रकार फारच लोकप्रिय केला आणि या कविद्वयाचें अनुकरण अर्वाचीन महाराष्ट्रीय कवींनी केलें केशवसुतांनी या काव्यप्रकारास, त्यातील ओळींच्या ठराविक संख्येवरून, चतुर्दशक असें नाव दिलें पण पुढें तें मागें पडून, पुण्याच्या 'रविकिरणमंडळानें' दिलेलें 'सुनीत' हेंच नांव आतां स्थिर होऊन रूढ झालें आहे

इंग्रजींत, सॉनेटच्या चौदा ओळी असाव्या असा एक साधारण निर्बंध आहे दुसरा निर्बंध अर्थाचें आंदोलन एकामागून एक अशा दोन भावना, प्रसंग किंवा त्यानंतरची भावना, असें त्यांत आंदोलन असतें मिल्टन कवीच्या सॉनेटमध्यें दोन्ही भावना तुल्यबल असल्यामुळें भावनांचे आठ व सहा ओळी असे गट पडतात व आंदोलन भर समुद्रांतील लाटांप्रमाणें भासतें शेक्सपियरच्या प्रकारांत बारा ओळींचा मोठा विचार व त्यास पुस्तीवजा जोडलेला दोन ओळींचा कलाटणी देणारा विचार असतो खडकाळ किनाऱ्यावर फुटणाऱ्या लाटेप्रमाणें समारोप, एकदम खालीं पडणाऱ्या धबधब्याप्रमाणें शेवट, असा कांहींसा हा प्रकार घडतो म्हणजे सुनीतात ओळींची १४ ही ठराविक संख्या, व अर्थाचें आंदोलन किंवा कलाटणी हे दोन निर्बंध अवश्य झाले तिसरा निर्बंध यमकाचा यमकें नादमाधुर्यामार्गीं, व ओळींची माळ बांधण्यासाठीं उपयोगीं पडतात

मराठी छंदोरचनेंत वृत्त व जाति असे जे दोन भाग आहेत त्यांपैकीं बहुतेक जाति ठराविक चरणसंख्येच्या व लांब आंखुड ओळींच्या असून कांहीं दोन ओळींच्याच आहेत अशा १४ ओळी घेऊन कांहीं सुनीतें रचलीं गेलीं आहेत

विशिष्ट प्रकारचें काव्यशिल्प या दृष्टीनें सयमक कविता असणें व त्या यमकांची पूर्वयोजित यमकमाला असणें इष्ट आहे पुढें दिलेल्या सुनीतांत अशा यमक मालेनें चौदा ओळी कशा एकजीव होतात तें तुम्हांला कळेल सुनीत या शब्दाला

त्याच्या परभृतत्वावरून काहीं टीकाकाराकडून आक्षेप घेण्यात येतो, तो लक्षात घेऊन, ज्यात चौदा ओळीरूपी रत्नें ओंवली आहेत अशी 'रत्नावली' असें या पद्यप्रकारास आपण नाव देऊ, व मिल्टनच्या आठ अधिक सहा या चरणप्रकाराला 'पद्म' सहा पायाचा भुंगा बसलेले आठ पाकळ्याचें कमळ, असें नाव देऊ व शेक्सपियरच्या १२ + २ या चरणप्रकाराला, तीन चतुष्पाद गाई वळणारा द्विपाद 'गोपाळ' असें म्हणू

चांगलें सुनीत ( रत्नावली ) पद्म किंवा गोपाल या प्रकाराचें असून पद्मात विचाराचें आंदोलन व गोपालात अखेरची समारोपाची कलाटणी असते. पद्माची यमकरचना 'श्री लक्ष्मीदेवीस' व 'खडाळ्याच्या घाटांत' ह्या रत्नावल्या लक्षपूर्वक वाचल्यास तुम्हास कळेल १, ८, ९, १४ या ओळींत एकच प्राणयमक साधल्यामुळें, भुंगा व कमळ यांची पूर्ण शरीरें एकत्र जोडलीं जातात पदपदीच्या भिन्न यमकपद्धतीनें विचाराचा शेवट आलासें वाटतें व अखेरीस एकसूत्री पद्म-रत्नावली होते. त्याचप्रमाणें 'गोपालांत' द्वादशचरणी विचारापुढें द्विचरणी यमकयुग्मकाची कलाटणी असते 'गोपाल' रत्नावलींत यमकाच्या भिन्न पद्धती उपयोगिल्या आहेत. कोणी यमक-युग्मकें बांधतो, कोणी दुसरा तिसरा किंवा पहिला तिसरा चरण जुळवितो

वरील विवेचनावरून रत्नावलीचे मुख्य निबंध तुमच्या लक्षांत आले असतील विचार गहन, भावना उदात्त व कल्पना रमणीय असल्याशिवाय 'रत्नावली' उत्कृष्ट ठरत नाहीं.

**१८. सुनीत** सुनीत या काव्यप्रकाराविषयीं आतापर्यंत जें विवेचन केलें त्याचंच कवीनें केलेलें काव्यमय आविष्करण तुम्हाला यात दिसेल शार्दूलविक्रीडित वृत्ताच्या चवदा ओळीत [illegible] घेऊन हें सुनीत रचलें आहे पहिल्या आठ ओळींत कवितानिर्मिती कशी होते हें सांगितलें असून शेवटच्या सहा ओळींत कवितेंत योजिलेल्या शब्दांत सुंदर धमगिरी जरी दिसली तरी त्यांतील खरीं रहस्यें कवींची कवीलाच माहीत असतात. कविता वाचून कवीची मन स्थिति अमुक प्रकारची असावी असा रसिकानें केलेला तर्क पुष्कळदा चुकीचा असतो, त्या शब्दाशब्दांतून गुंफलेल्या अदृश्य धागा धरून कवि मनांतल्या मनांत संपूर्ण चित्र उभें करून जेव्हां ती कविता वाचतो तेव्हां त्याच्या एकत्र्यात्मकता व्या मनःस्थितींत ती कविता निर्माण झाली असते, त्या मन-

स्थितीचा अनुभव येतो, असा विचार व्यक्त केला आहे. "मोत्यांवाचुनि शिंपलेच बघतां नेत्रीं उभीं आसवें !" अशी ओळ लिहून जी विचाराची मुरड किंवा कलाटणी कवीनें दिली आहे ती या सुनीताचें वैशिष्ट्य दाखविते. दोन्ही विचार बहुतेक समतोल, गंभीर व चित्त व्याकुळ करणारे आहेत. या सुनीत प्रकारास 'पद्म' असें नाव दिलें आहे.

यांतील "आम्ही ताजमहाल भव्य रचितों हा शब्दसंपत्तिनें। ज्याचें त्यांस रहस्य राहुनि, जनां कारागिरी लाभणें " या दोन ओळींत कवितेच्या स्वरूपाचें केलेलें दिग्दर्शन अतिशय मार्मिक आहे. शहाजहान बादशहानें आम्यास जो ताजमहाल बांधला तो केवळ जगाला आपली कल्पकता दाखविण्याकरितां नसून त्याला आपल्या पत्नीबद्दल ज्या विशिष्ट भावना वाटत होत्या त्याचें निदर्शक म्हणून तो त्यानें बांधला. ताजमहालाच्या कारागिरीच्या मागें शहाजहानच्या अन्तःकरणातील विव्हलता होती. जनमनें रंजविण्याचा हेतु त्यामागें नव्हता; आणि म्हणूनच कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांनीं ताजमहालावर लिहिलेल्या एका कवितेंत त्याला 'सृष्टीच्या कपोलावरील एक अश्रुबिंदु ' अशी उपमा दिली आहे. जी गोष्ट ताजमहालाची तीच कवितारूपी ताजमहालाची. उच्च दर्जाच्या कारागिरीमुळें कौतुकास्पद झालेली एखादी कविता ताजमहालाप्रमाणेंच कवीच्या हृदयातील विव्हलतेंतूनच पुष्कळदां निर्माण झालेली असणें शक्य आहे.

१९. श्री लक्ष्मीदेवीस हें सुनीत "पद्म" प्रकाराचा उत्कृष्ट व अद्वितीय नमुना आहे. इंग्रजी कवि मिल्टन याच्या "मी आंधळा झालों तर" या सुनीताप्रमाणें या सुनीताची रचना पहिल्या आठ ओळींत एक विचार, दुसऱ्या सहा ओळींत एक विचार अशी आहे

आतापर्यंत "सोनें रुपें आम्हा मृत्तिकेसमान" अशा तऱ्हेचे विचार मांडले जात असत, त्यांची दुसरी बाजू कवीनें या कवितेंत मांडलेली आहे. संपत्तीचा तिटकारा तुकारामासारखे संतकवि कां करितात याचीं कारणें तो लपवीत नाहीं माणसाचें चारित्र्य लक्ष्मी पुष्कळदां मलीन करते, ती चंचल असल्यामुळें क्षणभरच टिकते, मनुष्याला ती मोहांध करते, हें सर्व खरें; पण केवळ पैसा नसला म्हणजे माणूस कितीहि गुणसंपन्न असला तरी त्याची जगात फारशी किंमत न राहतां कशी दुरवस्था होते हें कवीस अनुभवावरून पटलें आहे. संपत्तीचे जसे

अनिष्ट परिणाम होतात तसे इष्टहि होतात. संपत्ति जवळ असली तर लोकोपयोगी अशीं प्रचंड कार्ये करिता येतात, अशक्य गोष्टी शक्य कोटींत आणता येतात, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें संपत्ति ही माणसाच्या उन्नतीला केव्हांहि सहाय्यकच होते, अशा तऱ्हेचा विचार कवीनें यात मांडला आहे.

**२०. गोपाळ कृष्ण गोखले** पहिल्या भागातील 'आगरकर' हें व्यक्तिचित्र व प्रस्तुतचें सुनीत हीं ताडून पाहाण्यासारखीं आहेत या कवितेतील पहिल्या चार ओळी गोखल्यांची शांत हसरी मूर्ति, त्यांच्या डोळ्यातील बुद्धीची चमक, त्यांच्या मनाची सहनशीलता, हृदयाचें औदार्य आणि त्यांची मोहक भाषाशैली यांची चित्रें डोळ्यांपुढें उभीं करितात 'आगरकर' ही कविता वाचकाच्या विवेकबुद्धीस जागृत करते, तर ही कविता मनोभावनांना हलवून सोडते. विरोधकांना न जुमानतां आयुष्याच्या अखेरीपर्यंत देशासाठीं देह झिजवणाऱ्या धीरोदात्त अशा या कार्यकर्त्यांच्या अल्प दर्शनानें कवीच्या अंतःकरणात भावनांचा जो कल्लोळ उत्पन्न झाला, त्यातून ही कविता निर्माण झाली आहे त्यांत करुणरसाऐवजीं भक्तिरसाचा परिपोष झाला आहे.

चार ओळींत चित्र, नंतर विचार, पुन्हा चित्र अशा तऱ्हेची या सुनीताची मांडणी झाली आहे त्याचा शेवट भक्तिभावानें केलेल्या नमस्कारांत होतो, त्यामुळें विचाराची एकदम कलाटणी हें जें सुनीताचें वैशिष्ट्य तें यात आढळत नाहीं हा यातील एक दोष आहे, तो वगळल्यास गंभीर विचार प्रकट करणारें असें हें एक उत्कृष्ट भावगीत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**२१ स्मरण** या सुनीताचे कर्ते श्री माडखोलकर हे व्यासंगी व कुशल टीकाकार म्हणून विशेष प्रसिद्ध आहेत मराठी साहित्याप्रमाणें आंग्ल साहित्याचाहि याचा अभ्यास दांडगा आहे. गद्यलेखनाच्या मानानें याचें पद्यलेखन जरी अगदींच अल्प असलें तरी तें गुणसंपन्न आहे. स्वतःच्या कवितेविषयीं एका सुनीतात ते लिहितात,

> "जे जे भाव मनांत दाटति परी ज्यांना न वाचा फुटे
> एकांतातहि, तेच ओतित पुढें काव्यात मी आपुल्या"

प्रस्तुत सुनीत एक लहानसो विलापिकाच आहे यांत तात्त्विक विवेचनाच्या फंदात न पडतां कवीनें मित्रवियोगामुळें झालेली मनाची स्थितीच फक्त वर्णन केली आहे. श्री माडखोलकर यांनीं आपल्या "विलापिका" या टीकाग्रंथांत

आयुष्यांत क्वचित् अशा एखाद्या व्यक्तीशीं आपला संबंध येतो कीं, तिच्या अल्प-काल घडलेल्या सहवासाचेंहि आपल्या जीवितावर उदात्त, रम्य संस्कार होतात आणि त्या व्यक्तीचा वियोग होऊन गेल्यावर, तिच्या सहवासाचें स्मरण हें आपल्यास स्फूर्तीचें निरंतर निधान होतें. " असे जे विचार व्यक्त केले आहेत ते या सुनीताला तंतोतंत लागू पडतात.

या सुनीताशीं कवि गिरीश यांचें " मैत्रीचें सिंहावलोकन " व कवी माधव ज्युलियन् यांचें " मैत्रीची स्मृति, " हीं सुनीतें ताडून पाहण्यासारखीं आहेत.

किंचित् काळ दूर गेलेले मित्र, दूषितग्रहामुळें दुरावलेले मित्र आणि चिरविरहांत पडलेला मित्र, याविषयींच्या भावना, माडखोलकर, गिरीश, व माधव ज्युलियन् यांच्या या तीन सुनीतांत आढळतील.

माडखोलकर यांनीं या सुनीताची सुरवात कशी अचानक केली आहे ती पहा. अशाच तऱ्हेची सुरवात " आतां मी कविता लिहीन म्हणुनी " या ओळीनें " निवेदन " या सुनीतांत त्यांनीं केलेली आहे. एके काव्यीं अशी सुरवात करण्याचें वेड कवींत फार होतें.

या सुनीताच्या शेवटच्या ओळीच्या आरंभावर माधव ज्युलियन्‌च्या रचनापद्धतीची छाया पडलेली दिसेल. हें सुनीत ' गोपाल ' या प्रकारांत मोडतें. यमकें असून विशिष्ट रचनेचें बंधन पाळलें नाहीं. शेवटची कलाटणी तीव्र नाहीं पण दोघानीं केलेले बेत ढांसळून जाऊन जीवनांत एकलेपणा आला ही कल्पना शेवटच्या ' मन् हें चित्त तुला स्मरून सहसा शोकें जळूं लागलें ' या ओळीनें जास्त दुःखद व भीषण वाटूं लागते.

२२. शुक्रतारा. सुनीतातील उदात्त विचार, गंभीर संथ प्रवाह व विशाल रमणीय कल्पना हे विशेष तुम्हांला या सुनीतांत आढळतील. पृथ्वीपेक्षां कमी अंतरावरून सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालणारा शुक्र कधीं सायंकाळीं तर कधीं पहाटेस उगवतो. त्यावेळीं तो इतका तेजस्वी व रमणीय दिसतो कीं त्याकडेच मन वेधतें. दिवसाचे श्रम संपवून घरीं विश्रांतीस परत जाणाऱ्या जिवाला सायंकाळीं तो प्रेमाचें प्रतीक भासावा किंवा शांतीचा दूत वाटावा हें किती स्वाभाविक आहे ! रात्रीं शांत झोंप लागून पहांटे जागा झालेला मनुष्य शुक्र पाहील तर त्यास काय वाटेल ? मन ताजेंतवानें व उल्हसित झालें आहे, शीतल मंद वारे सुटले आहेत,

सभोंवती शांत असा अंधार पडला आहे आणि पूर्वेकडे तेजस्वी तारा चमकत आहे असें पाहिल्यावर कवीच्या मनांत उदात्त व शांत असेच विचार येतात. आणि हाच तारा पूर्वी लोकांना मार्गदर्शक झाला असावा अशी कवी कल्पना करतो आणि मग त्याला असें वाटतें कीं, आधुनिक जगाच्या कोलाहलांत हाच तारा पुन्हां ध्येयाचा मार्ग दाखवील

**२३. कवितेचा जन्म.** या सुनीतांत कविता कशी जन्माला येते, हें सांगण्याचा कवीनें प्रयत्न केला आहे प्रतिभावान् लेखकाचे स्फूर्तीनें उत्पन्न झालेले पद्यमय भावनात्मक विचार, म्हणजे काव्य, अशी काव्याची सुटसुटीत व्याख्या लक्षांत ठेवून हें सुनीत वाचा म्हणजे कवितेच्या जन्माची कवीनें केलेली मीमांसा तुम्हाला लवकर पटेल

**२४ तीन कला** भवानीशंकर पंडितांच्या ह्या कवितेंत नवलकाव्यातील कल्पनाचातुर्य, चित्रांतील रेखीवपणा व शब्दाची माधुरी हे तिन्ही गुण एकत्र झाल्यामुळें शेवटच्या दोन ओळींत त्यानीं ईश्वरास टाकलेल्या प्रश्नाचें उत्तर स्वतःच्या कवितेच्या रूपानेंच दिलें आहे.

पहिल्या सहा ओळींत जी भव्य कल्पना उभारली आहे ती मिल्टनच्या कवितेचा भास उत्पन्न करिते चित्र, काव्य आणि गायन या कला सृष्टीत पदोपदी आढळतात मानवाच्या कृतींत कधीं त्याचा अभाव असतो तर त्या कधीं कधीं एकएकट्या आढळतात त्याचा परमोच्च संगम एकाच वेळीं आणि एकाच ठिकाणीं आढळेल तर किती उत्तम गोष्ट होईल असें कवीस वाटतें.

**२५. खंडाळा घाटांत** या सुनीतांत (पद्य) रचना व्यवस्थित व यमकांची बांधणी विशिष्ट प्रकारची आहे. पहिल्या आठ ओळींत आगगाडींतून जाताना घाटात दिसणारें दृश्य वर्णन करून, गाडी चालविणाऱ्या ड्रायव्हरला नित्य परिचयामुळें यांत कांहीं नवीन वाटत नसलें तरी माझ्या आशावादी मनाला सृष्टीचें कौतुक वाटतें असें कवी सांगतो. पहिल्या आठ ओळींतील यमकें गिरिशाच्या "कवितेचा जन्म" मधील यमकाप्रमाणें आहेत, व पुढील नी, ती, ती, ना, नी, ना, अशी आहेत यमकांचें एकत्र विशिष्ट बंधन कुणीहि सर्रास पाळलें नाहीं असें तुम्हास या सुनीतावरून दिसून येईल

"आम्बरव" व "रथचालक" हे दोन शब्द कवीने इंग्रजी रूढ शब्दांऐवजी मुद्दाम वापरले आहेत.

खंडाळ्या घाटाच्या दर्शनानें पुष्कळांना स्फूर्ति होते त्याची वनश्री, त्याच्यातील बोगदे, वांकडी वाकडीं वळणें, उंच पोहोचल्यावर पायाखालचा हिरवागार दिसणारा भूप्रदेश यांचीं वर्णनें कवितांतून व कादंबऱ्यांतून केलेलीं तुम्हीं वाचलीं असतील

२६ घाटांतल्या खुणा पूर्वी पुण्याहून मुंबईस जातांना लोणावळ्यास घाट इंजिन लावीत व रिव्हर्सिंग स्टेशनवर गाडी उलट दिशेनें चालू लागे त्या काळीं लहान मुलांना 'चालु, अगे! आपण चाललों परत' असें म्हणून रडवण्याचा मोठ्या माणसाचा प्रघातच असे त्या वेळीं एका बाजूला खोल दरीच्या पलीकडे नागफणी ( ड्यूक्स नोज-ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें नाक ) उंच धारेदार दिसे दुसऱ्या बाजूला खोपवलाचें सपाट खोरें दिसे रिव्हर्सिंग स्टेशनावर इंजिन या टोंकाचें त्या टोंकाला जोडीपर्यंतच्या वेळात लोक उतरून सृष्टिसौंदर्य पहात असत हल्लीं विजेच्या गाडीचा वेग वाढल्यामुळें व नवीन सरळ रस्ता केल्यामुळें ती संधि प्रवाशास मिळत नाहीं पावसाळ्यांत भर पावसांत मुद्दाम मित्रमंडळीबरोबर खंडाळ्याच्या घाटात जाऊन तेथील वनश्री पाहण्याचा कवीचा प्रघात या कवितेंत न कळत उघड झाला आहे 'खंडाळ्याच्या घाटांत' या कवितेंतील कवी आगगाडींतून प्रवास करीत आहे आणि प्रस्तुत कवितेचा लेखक पावलापावला गणिक दिसणारें दृश्य डोळेभरून पहात आहे, त्याच्या सूक्ष्म नजरेंतून रानझाडें लपत नाहींत, क्षणात होणारे फेरबदल त्याच्या भावनांतरल मनावर परिणाम करीत आहेत असें तुम्हाला दिसेल एवढेंच नाहीं तर त्याच्या विचारप्रवण मनाला, त्याच्या सौख्यवादी मनाला, आजचें सुख महत्त्वाचें आहे हा तात्त्विक विचारहि सुचतो शेवटच्या दोन ओळी विशेष महत्त्वाच्या आहेत प्रत्येकाच्या आयुष्यांतील महत्त्वाचा प्रसंग, किंवा सुखदु:खांच्या घटना ज्या विशिष्ट स्थळीं घडल्या असतील त्या स्थळांना आठवणींत विशेष स्थान मिळतें पूर्वीचें आयुष्य विस्मरणाच्या अंधारांत बुडालें असतां एखाद्याच मोकळ्या स्थळावर झगझगीत प्रकाश पडलेला असतो पुन्हा असा प्रसंग येवो न येवो, आजचे सुहृद् व प्रिय माणसें पुन्हां भेटोत न भेटोत, पण ह्या घाटाच्या खुणा पुन्हा जेव्हां जेव्हां दिसतील तेव्हां तेव्हां या सौख्याची आठवण ताजी होईल ही सर्वांना पटणारी गोष्ट असल्यामुळें कविता सर्व जनसमूहास आपलीशी वाटते

या कवितेंतील "होई अमुक काल विस्मृतिमध्यें, नाहीं 'उद्या' माहित" ही ओळ उमर खय्यामच्या रुबायांपैकीं *'मृत होय काल ती उद्या अजून अजात'*

ही ओळ वाचल्यामुळें मनांत गुप्त राहिलेल्या विचाराचा पडसाद आहे. माधव ज्यूलियन् यांनीं नंतर उमर खय्यामच्या रुबायांचीं भाषांतरें केलीं. कवींच्या मनावर वाचनाचा कसा न कळत परिणाम होतो हें तुम्हाला या कवितेवरून कळेल.

एकच दृश्य पाहून भिन्न मनोवृत्तीच्या व परिस्थितींतल्या कवींच्या काव्यात किती फरक पडतो तें तुम्हांला समजून येईल.

## १८ सुनीत

होतो स्पर्श हळूच कोठुनि तरी, हृत्तार कंपाकुला
देते जागृति भावनेप्रति, जशी मदांनिळ सिन्धुला.
तेणें उद्भवती विचार, जलधीपृष्ठीं तरंगावली,
तसें सुंदर मौक्तिकेंच जणुं तीं ज्याच्यांत सामावलीं.
कांहीं आपण खोल ज्या दडविल्या नाना रहस्याकृती
शैवाळापरि ज्यांवरि फाडल्या दुःखासुखांच्या स्मृती
त्यांचे हे अवशेष लागति तदा कांठास लाटांसवें
मोत्यांवांचुनि शिंपलेच बघतां नेत्रीं उभीं आंसवें !
वाणीला दुबळीच निर्मिली जयें तो धन्य वाटे मला
वाणी व्यक्त जरी करील हृदयें, व्यापार आटोपला !
आम्ही ताजमहाल भव्य रचितों हा शब्दसंपत्तिनें
ज्याचें त्यास रहस्य राहुनि, जना कारागिरी लाभणें.
हातीं घेउनि तोच तंतु अपुल्या अर्थावरी गुंगतों,
तत्पूर्णत्व निजांतरीं उमगुनी ओळी पुन्हां वाचतों.

यशवंत

## १९ श्री लक्ष्मीदेवीस

ज्याचीं खोल तळांत जाउनि मुळें पक्षांत विस्तारलीं
मानेला विळखा सदैव बसलें शैवाल घालूनियां
ज्याची मान जळीं क्षणोक्षणिं पडे वायूंत डोलूनियां,
सूर्याच्या किरणांसवें सरतसे ज्याचें जिणें तोकडें,
आहे हा इतिहास या परि जरी देवी तुला आवडे—

त्या पद्मावरती सदा विलसणें, त्याच्या गुणीं गुंगणें
मालिन्यासह सेवणें क्षणिकता, पापांतही रंगणें,
साधूंनीं तुज मृत्तिकाच गणुनी यासाठिं धिक्कारिली.
धिक्कारोत मुमुक्षु; मी परि तुझी पूजा न अव्हेरली
आणि निर्धनता नरास पशुता या मोल मातीपरी
डोळ्यांना दिसतें मतीस पटतें सामर्थ्य लक्ष्मी तुझें
सद्भावें मग कोण सांग तुजला पूजावयातें वुजे ?
त्वत्साठीं सरिता वरी परतवूं, गाढूं गिरी सागरीं
सिंधूला घुसळूं, मुठींत मिळवूं दुष्प्राप्य रत्नावली.

यशवंत

## २० गोपाळ कृष्ण गोखले

(सुनीत)

धीरोदात्त तुझी अजून हंसरी मूर्ति पुढें खेळते
तें बुद्धिप्रभ लोचनांतिल दिसे औदार्य आकर्षक
ती गंभीर सहिष्णुता, वदनिंची शान्ती मनोदर्शक
तो मंजुध्वनि वाक्प्रवाह, पुढती सारें उभें राहतें !
स्वन्मानव्य अगाध ! नित्य रमलें देशैकभावें मन
राष्ट्रांच्या प्रगतींत पाउल पुढें केव्हां पडे हिंदवी
या चिंतेंत जळून, दूर करण्या दुःखें तशीं यादवी
सोशी घाव अघोर ऐरणिवरी, घायास तेजःकण
होतें व्याकुळ चित्त ! बांधव तुझ्या दारीं तदा पातले
अश्रूंनीं हंसरें कलेवर तुझें तें न्हाणुनी वंदिती
कार्यांमाजिं तुझ्या अलौकिक अशें देवत्व ते पाहती
तें हृन्मंदिरिं सांठवून, सुमनीं त्यांनीं तुला पूजिलें
इत्यादृत्यकर्णात हें प्रगतिचें चैतन्य आलोकितों
अन् मी भारतसेवका, तुज मनोभावें नमस्कारितों

गिरीश

## २१ स्मरण

हा घेऊन निरोप मी परतलों जाया घरातें पुन्हा,
*मार्गे खाउनि ओढ चित्त फिरे का मार्गेच रेंगाळलें ?*
त्याचीं कौतिक भाषणें, प्रिय तरी प्राणाहुनी सगती
याचा लोभ सुटे न, सपुनि जरी गेली सुखाची निशा
काव्याच्या परिशीलनांत अथवा गप्पांत कांहीं तरी
एकामागुनि एक ते न कळता गेले निघूनी क्षण,
ताराची मधुर द्युती पसरली विश्वावरी जेधवां
रात्रीचें भयद स्वरूपहि गमे गंभीर-शांतिप्रद,
तेव्हा बैसुनि बोललों बहुपरी रस्त्यात कट्ट्यावरी
गोष्टी आणि अनेक उज्ज्वल मनोराज्यहि केलीं उभीं,
तें सारेंहि मनात येउनि पुन्हा मातें असें वाटलें
कीं, स्वप्नें न अशक्य कोटिंतिल तीं, होतील आता खरीं !
तों डोळ्यांपुढती चरित्र अपुलें राही उभें मागलें
अन् हें चित्त तुला स्मरून सहसा शोकें जळूं लागलें

ग. त्र्यं माडखोलकर

## २२ शुक्रतारा

मी जेव्हा तुज पाहतों तळपतां सूर्यास्त झाल्यावर,
उत्कंठा हृदयात दाटुनि मला तेव्हा असें वाटतें
आली घेउनि रत्नदीप गगनीं कांतास शोधावया
काळाची भगिनी, प्रभा मधुर ही त्याचीच का फाकली ?
किंवा त्यातुनि इंदिरा प्रगटली तें दिव्य हेमांबुज
या गंभीर, अथांग सिंधुवरती शून्याचिया शोभतें,
कीं हे कष्ट करून विश्व शिणलें त्याला निशा द्यावया
येते शांति, सदैव दूतच तिचा तू काय अग्रेसर ?
तू प्रातःसमयीं परतु दिससी पूर्वेकडे जेधवा

आले लावुनि दृष्टि ज्यावर मुनी खिस्तास शोधीत ते–
ज्याच्यामागुनि,–तोच काय असली तेजाळ तूं तारक ?
द्वेषाग्नी भडकून विश्व जळतें–हें भोगितें यातना,
तो श्रेयस्कर मार्ग दाविशिल का तूं आज त्याला पुन्हां ?

ग. त्र्यं. माडखोलकर

## २३ कवितेचा जन्म

दृश्यें सुंदर हीं अनंत दिसती, वाटे धरूं कोणचीं
अंतर्लोचन पाहती टकमक; व्यामोहते भावना
कांहीं अस्फुट धावती द्रुतगती आकाशिंच्या कल्पना
ये आंतून उचंबळून, धरतां जाती किती हातचीं !
कांहीं रंग सुरेख इंद्रधनुचे वा पाचुची पालवी
सूर्याचे कर चंड वा शशिकला केव्हां सुधावर्षिणी
केव्हां कोमल भाव, नाजुक मनें प्रेमांतराकर्षिणीं
केव्हां भेसुर दृश्य, कुणितरी ऐसें जिवा हालवी
गाई अस्फुट गीत मंजुल कुणी तों आंत घोषेसवें,
कोणी कुंचलिनें चितारित बसे रंगामध्यें अंबर
फेसाळून खळाळ गर्जुनि हृदीं हेलावतो सागर
चित्तीं गोंधळ होउनि क्षण मला ना हालवे बोलवे !
देवी, एकवटून वृत्ति विरली लागे समाधि जरा
होतां सृष्टि सुधामयी तव, वदे सानंद कांहीं गिरा.

गिरीश

## २४ तीन कला

सन्ध्याकार समोर ठेउन उभे अस्तोदयांचे फळे
रश्मींचे भरपूर छंद कृता तूं घेसी करीं कुंचले
मेघांचे मग स्वच्छ जाड पडदे त्याच्यावरी ठेकुनी
चित्रें रम्य चितारिसी अनुदिनीं; जीं बिंबती लोचनीं

काव्यस्फूर्ति तुझ्या हृदीं सहज हो तीं पाहतां पाहतां
उद्रेकीं रचिसी अनंत कविता तू भावनालङ्कृता
आकाशावर ठेविसी लिहुनि त्या नक्षत्रमालामिषें
पर्णी आणि शिराक्षरीं, भ्रमतिला तें ज्ञात व्हावें कसें ?
वीणा मंजुळ वायुची तदुपरी तू छेडिसी कौशलें
गासी गोड गळ्यावर स्वकविता आलाप घेसी खुले
वीचींचा कलनाद—तोच घुमवा आवाज भासे तुझा
नेई चित्त हरून तो, न ठसली कर्णास त्याचे मजा
ईशा ! चित्रणकाव्यगान असती तीन्ही कला त्वत्सुता
त्याची मानवसभवीं कधितरी होईल का एकता ?

भवानीशंकर पंडित

## २५ खंडाळाघाटांत

नेसी वाप्परथा ! इथून हळुनी मदेह तू सत्वर
घाटातील उदात्त दृश्य परि ने चित्ताप्रती मागुती,
वाजूला तुटके कडे, नगशिरें दृष्टीपुढें टाकती
झाले धूसर बाष्पयुक्त सगळे ज्याचे महाकंदर !
शोभे दाट अफाट पाच हिरवी झाडी उतारावर
काळ भिन्न कपार ज्यातुन झरे घेती उड्या खालती,
होवोनी परिवर्तनें वर खुले सद्रंग दीर्घाकृती
स्वर्भू जोडित इंद्र-चाप, नमवी साश्चर्य माझें शिर
नित्याचा रथचालका ! तुज दिला हा मार्ग सयोजुनी
कांहीही तुज यामुळें न नवता दृश्यें अशीं भाविती
नित्याचा सहवास अध करितो सौंदर्य-दृष्टीप्रती—
होतें जीवन मानवी म्हणुनिया कंटाळवाणें जनां—
अद्यापी परि रोविलें न जगतें नैराश्य माझ्या मनीं
सारी कौतुक-पूर्ण सृष्टि म्हणुनी पाही मनोभावना !

के. नारायण काळे

## २६ घाटांतल्या खुणा

लोंढा खालुनि ये वरी भरुनि तों जाई धुक्यानें दरी,
जाई नागफणी बुडून तंव हा लागे दिसाया तळ,
घेती शेप धळींतुनी खळखळा फेसाळले ओहळ,
झाडी धुंगट घे, परंतु गवती नाचे हरिसुंदरी.
पानाआड खुले कचोरकलगी, लोमें चवेणी फुले,
लाखों सूर्यफुलें इथें चिमुकलीं, हे किर्मिजी तेरडे,
हासे डोंगरभाग ऊन हंसरें गाळीव जेव्हां पडे,
ओलें रान बघुन शांतिलहरी स्वांती सुखाची उठे
तों येई हिरिरी नवीन कल्लो लाटेप्रमाणें धुकें
ऐशा दोन धुक्यांत अंतर पडे तें आमुचें जीवित
होई अमुक 'काल' विस्मृतिमधें, नाहीं 'उद्यां' माहित,
देई चंचळ 'आज' पुण्य सुख हें—होईल का हें फुकें ?
आला योग कसा अकल्पित असा येवो न येवो पुन्हा,
सौख्याची स्मृति ठेवितील परि त्या घाटांतल्या या खुणा.

माधव ज्यूलियन्

### स्वाध्याय

१८. सुनीत. या सुनीतात यमकांचीं युग्मकें आहेत. त्यामुळें यमकांच्या विशिष्ट आवर्तनामुळें होणारी बांधणी दृष्टीला किंवा कानांना दिसत नाहीं. कल्पना व विचार दोन्ही दृष्टांत प्रखरचीं आहेत.

'चांगल्या सुनीतात ताजमहालाप्रमाणें कारागिरी असते' हें सुनीताच्या लक्षणावरून स्पष्ट करा.

समुद्र, लाटा, शिंपले व तारे हे दृष्टांत ज्या विचारांस उद्देशून आहेत ते विचार तुमच्या भाषेत मांडा.

रुसलेल्या, व्यापार, या शब्दांचे अर्थ द्या.

१९ श्री लक्ष्मीदेवीस. या पद्मसुनीतांतील यमकें पहा.

१, ८, ९, १४ ओळी ली हें यमक, दोन्ही विभागांचे आयत जोडतें
२–३, ४–५, ६–७ हीं युग्मकें आहेत
१०–१३, ११–१२ हीं युग्मकें आहेत

एकाद्या इमारतीला कमी जास्त उचीचीं शिखरें असावींत आणि लावून ती इमारत सुंदर वाटावी तसाच हा प्रकार आहे कीं नाहीं? यमकाची ही रचना लक्षात ठेवा आणि यमकें कशीं जुळतात तें ऐका. बहुतेक कवी इतकी भानगड करीत नाहींत तर ते 'गोपाल' प्रकारचींच सुनीतें रचतात.

लक्ष्मीची कोणती अभिरुची साधूला आवडत नाहीं तें सांगून कमलाच्या जीवनाचें वर्णन करा

२०. गोपाळ कृष्ण गोखले यादवी, ऐरण, हृन्मंदिर, भारतसेवक या शब्दांचे अर्थ व चरित्रांतील संदर्भ थोडक्यात सांगून कवितेंतील कल्पना स्पष्ट करा चित्र उभें करणारे शब्द निवडून काढा या सुनीताची नाट्यच्छटा तयार करा

कवि मोजक्या पण अर्थपूर्ण शब्दांत एकटाच किंवा स्वतःशीं बोलतो आहे अशी कल्पना करा

गोखल्यांच्या कामगिरीची माहिती द्या

गोखले यांचें चरित्र १९१४ मासिक मनोरंजन वसंत अंक, व टिळक-चरित्रें—न. चिं केळकर, आळतेकर, या ग्रंथांचा उपयोग करा

२१ स्मरण. विलापिका–शोकगीत म्हणजे काय? (भाग पहिला पान ५८ वरील विवेचन व कविता पहा )

२२. शुकतारा कवितेंतील कल्पना स्वतःच्या शब्दांत सांगा
खिस्त व मुनी यांचा दृष्टांत येथें कसा लागू पडतो तें पहा
या पद्मप्रकारांतील यमकरचना लिहून काढा

२३ कवितेचा जन्म 'नामापासून क्रियापदरूप बनविणें हा गिरीशाचा विशेष दिसतो ' या टीकेच्या समर्थनासाठीं कांहीं क्रियापदें सांगा

या सुनीतांतील यमकाची विशिष्टरचना आहे तीं अंत्याक्षरें लिहून काढा. पहिलें व चवथें यांचें एक यमक, दुसरें व तिसरें चरणांचें एक यमक

असून (१-२-२-१, ३-४-४-३, ५-६-६-५, ७-७) अशी यमकबांधणी आहे १३ व १४ ओळींचें स्वतन्त्र युग्मक आहे

२४ तीन कला शिराभरी–पानांच्या शिराच्या अक्षरात

*"आकाशातील चित्रें, वायु व सागर यांचें गान, तारे व पानें या अक्षरानीं लिहिलेलें गूढ काव्य, हा ईश्वराच्या कला" हा कवीचा भावार्थ स्वतःच्या शब्दांत सांगा*

२५. खडाळा घाटात 'अतिपरिचय खोरा मान रहात नाहीं,' या अर्थाच्या दुसऱ्या म्हणी देऊन या कवितेंतील कल्पना स्पष्ट करा

*आशा व निराशा यांचे मनावर काय परिणाम घडतात असें कवीला वाटतें ? इंद्रधनुष्यासंबंधीं इतर कवींनीं केलेल्या कल्पना सांगा*

२६ घाटातल्या खुणा नागफणी 'ड्यूक्स नोज' हें प्रसिद्ध शिखर हिरिरी–स्पर्धाईचा आवेश कचोर–मुरसरपट पानांतून वर जांभळ्या रंगाचीं फुलें असलेली वनस्पति कल्गी–फुलछडी चवेणी–रानकेळ

*या कवितेंतील प्रत्येक शब्द कसें रेखीव चित्र दाखवितो तें पहा*

*धुंगर, घळ, गाळीव या शब्दांची जरूरी काय आहे तें सांगा*

*इतर कवींनीं केलेल्या जीविताच्या व्याख्या ताडून पहा*

---

# ४ व्यंग काव्य

विनोदी काव्यांत अनेक प्रकार आहेत त्यांतील एक, ज्याला पॅरडी अशी संज्ञा आहे, तो होय या प्रकाराचें स्वरूप लक्षात घेतां, त्याला व्यंग काव्य हा प्रतिशब्द अधिक युक्त ठरेल

*व्यंग काव्यात मूळ कृतीविषयीं आदरभाव असूनहि, त्यांतील विशिष्ट भाषा शैलीचा, विचाराच्या स्वरूपांचा बारकाईन अभ्यास करून, तेच विचार, तीच भाषा दुसऱ्या आधुनिक तुलनेनें क्षुद्र वाटणाऱ्या विपर्यासांच्या वर्णनांत किंवा विवेचनांत ठळकपणें वापरली, किंबहुना तोच कवी लिहितो आहे, असा भास उत्पन्न केला, तर तें व्यंग काव्य होईल*

यऱ्या व्यग काव्यानें जातिवत कवीच्याहि मनाला गुदगुदल्या झाल्या पाहिजेत. मूळ काव्यकृती जितकी उच्च दर्जाची व लोकप्रिय, तितकें त्यावर व्यग काव्य करणें कठीण व म्हणूनच जास्त कौशल्याचें समजलें जातें

चित्रकलेंत व्यग चित्रें म्हणून जो प्रकार आहे, त्याचें व व्यग काव्याचें अत्यत साम्य आहे व्यक्तीची कुचाळकी करणारीं, अधम वृत्तीचें प्रदर्शन करणारीं काव्यें व चित्रें वगळलीं, तर ओळख पटविणारीं चिन्हें वाढून जशीं पाश्चात्य नियतकालिकात प्रसिद्ध पुरुषाचीं व्यगचित्रें रेखाटलीं जातात, तशींच हीं काव्यमय चित्रें रेखाटलेलीं असतात नभात विहार करणाऱ्या चद्राचें गढूळ पल्वलात पडलेलें तरलित प्रतिबिंब विकृत प्रतिकृति असतें, तर अर्धगोल फुगीर किंवा सखल आरशात दिसणारा चेहरा ओळखीचा दिसूनहि विनोदविषय होतो व स्वत पाहणारालाहि हसून हसून पोट दुखू लागतें व्यगकाव्य किंवा व्यगचित्र याचेंहि तसेंच आहे

**२७. बल्लवदूत.** कालिदासाचें 'मेघदूत' हें काव्य पुढें ठेवून ना ग लिमये यानीं लिहिलेल्या 'बल्लवदूत' या व्यगकाव्यातून हा उतारा घेतला आहे कालिदासाच्या काव्यातील नायक जो यक्ष, तो मेघाला आपला दूत बनवून अलकावतीला आपल्या पत्नीकडे पाठवितो, तर या काव्यातील नायक पुण्याच्या शेतकी कॉलेजातील विद्यार्थी असून, तो कॉलेजच्या भोजनगृहातील बल्लवाला मुबईस आपल्या पत्नीकडे पाठवितो अलकावतीस पोंचेपर्यंत वाटेंत ढगाला काय दिसेल, कोण कोण भेटेल याचें वर्णन यक्ष करतो, तर हा विद्यार्थी बल्लवाला कॉलेजपासून मुबईंतील आंबेवाडीपर्यंत ( या वाडींत त्याची पत्नी रहात असते ) काय दिसेल व कोण कोण भेटेल याच वर्णन करतो परिचित प्रसगातील क्षुद्रतेमुळें दुसरें काव्य विनोद निर्माण करणारें झालें आहे विनोद निर्माण करणें हाच कवीचा हेतु असल्यामुळें, मूळ कृतीचें व्यगानुकरण त्यानें मोठ्या खुबीनें केलें आहे खालील ओळी वाचा म्हणजे या खुबीची तुम्हाला कल्पना येईल

**( कालिदास )** झालें तेवीं मुदत बहु फिकें पक्व पणारामान
हातातोनी वलयहि गळू लागलें मूल्यवान
**( लिमये )** हातातोनी हळु हळु गळू लागलें रिस्टवॉच
**( कालिदास )** माझ्या दु खें बहत झुरते चक्रवाकीसमान

लागोनीया हिमकण वनीं पद्मिनी होय जेवीं
वारंवार स्मरुनि मज ती जाहली म्लान तेवीं
( लिमये ) माझ्या दुःखें बहुत झिजते जेंवि वीं शीसपेन
शोकें वाळे त्वरित गव्हले पापडाच्या समान
साबूफेनापरि जिरतसे या गळ्याचीच थाण
( कालिदास ) किंवा अंगीं मलिन वसनीं, रम्य वीणा धरोनी
गाया लागे मजविषयींचीं गोड गीतें रचोनी
( लिमये ) वा जात्याचा मलिन वसनीं घट्ट खुंटा धरोनी
गातांना ती मजविषयींच्या रम्य ओव्या रचोनी.
( कालिदास ) काढी ऐसा दिन परि तिला यामिनी जात नाहीं.
लोळे भूमीवरि, तिज नसे नीजही तेंवि पाहीं
( लिमये ) काढी ऐसा दिन परि तिला यामिनी जात नाहीं
लोळे भूमीवरि, तिज नसे नीजही ढेंकणांहीं.
( कालिदास ) गेलासे तो झुरुनि विरहें तूंहि गेलीस तेवीं
... ... ...
( लिमये ) बाई दंतव्रणसम झडाया तुझा नाथ लागे
जर्दाळूच्यासम सुरकत्या गालि त्याच्या वियोगें

कुणाहि व्यक्तीच्या भावना यत्किंचितहि न दुखवतां, दोन गोष्टींत किंवा परिस्थितींत विरोध निर्माण करून कसा विनोद निर्माण होतो हें वरील ओळींवरून तुम्हांला पटेल.

२८. आम्ही कोण. कवि केशवसुत यांनीं लिहिलेली ' आम्ही कोण ? ' ही कविता पुढें ठेवून ही व्यंग कविता श्री. केशवकुमार ( प्रल्हाद केशव अत्रे ) यांनीं लिहिली आहे. केशवसुतांची मुळची कविता, कवीच्या अमर्याद शक्तीच्या स्फूर्तिदायक पण उद्दाम, आवेशी पण व्यवहारांत अतिशयोक्तिपूर्ण वाटणाऱ्या विचारांनीं भरलेली अशी आहे. अर्थात् यांतील आवेश व दर्पोक्तीच्या पलीकडे पोंचणारी अतिशयोक्ति केशवसुतांसारख्या उच्च दर्जाच्या कवीला एक वेळ शोभून दिसेल, पण हुंगे सुंगे कवीसुद्धां तिचा उच्चार करून स्वत:ची प्रौढी गाऊं लागतात, तेव्हां कुणालाहि हंसू आल्याशिवाय राहणार नाहीं. धुंदींतून जागें करण्याकरितां अशाच

कवींना उद्देशून श्री अत्रे यांनी ही कविता लिहिली आहे यात केशवसुत किंवा त्याची कविता यांचा उपहास करण्याचा श्री अत्रे याचा उद्देश नाहीं

२९. हुकुमे हुकूम गोविंदाग्रजाच्या ज्या थोड्या विनोदी कविता प्रसिद्ध आहेत त्यांत कवींची व त्याबरोबरच खास अक काढणाऱ्या सपादकाची नाजुक हातानें चेष्टा करणारी कविता उत्तम आहे पण गडकऱ्यांच्या नाटकांत किंवा गद्य लेखात जो विनोदाचा दर्जा दिसतो तो या कवितातून दिसत नाहीं बुद्धि, कल्पना किंवा भाषेची रुच त्यांना अशा कवितात साधलेली दिसत नाहीं धनांत कविता न करितां घरीं खरडणारा, मृत पक्ष्याची कींव न येतां पक्ष्यास जिवें मारू पाहणारा कवि, हुकुमाप्रमाणें हटकून कविता लिहिता येते असें म्हणणारे व 'उरलेल्या मजकुराच्या जागेची भरती करणारी ती कविता' अशी कवितेची किंमत करणारे सपादक याचा मार्मिक उपहास या कवितेंत आढळेल

३० पाहुणे पाहुण्याविषयीं अनेक विनोदी चुटके व गोष्टी लिहिल्या गेल्या आहेत केशवसुताची 'दवाचे थेंब' ही कविता ज्याना माहीत नाहीं त्या वाचकाना ही कविता केवळ विनोदी आहे असें वाटेल पण ज्या भाषासरणीमुळें, कल्पनांमुळें किंबहुना वाक्यामुळें केशवसुतांनीं करुण रस व वात्सल्य याचा उत्कट परिपोष केला आहे, त्याच पद्धतीचा व वाक्याचा अवलंब करून या व्यंग काव्यात विनोदाची उभारणी केली आहे

३१ कादरखा जी स्थिति केशवसुतांच्या 'दवाच्या थेंबाची' तीच कवि माधव याच्या 'गोकलखा' ची मूळची वीररसाची अप्रतिम कविता, वाचकांना इतिहासातील 'गोकलखा' हें संबोधन अपरिचित असल्यामुळें किंचित् चमत्कारिक वाटली खरी, पण तिचें अनुकरण भराभर होऊ लागलें बऱ्याचशा कवींनीं शाळेंत कमविलेल्या तुट पुंज्या इतिहासाच्या पुजीवर भराभर ऐतिहासिक कवनें, ठराविक शब्दयोजना करून लिहिलीं गोकलखा या कवितेची चेष्टा करणें हा कवीचा हेतु नसून इतर कवींच्या कवि तांचा परामर्ष घेण्याच्या इराद्यानें कवीनें हें व्यंग काव्य लिहिलेलें दिसतें गोकलखाचें कादरखा हें विकृत स्वरूप दिसतें, तर दुसऱ्या व तिसऱ्या कडव्यात इतर ऐतिहासिक कवितांचा भास होतो कडव्यांची सुरवात व शेवट गोविंदाग्रजांच्या 'राजहंसा'ची आठवण करून देतात आणि व्यंग काव्याची कट्टु कल्पना बाजूस टाकली तर, 'कादरखा' हे एक विनोदी पण वस्तुस्थितिनिदर्शक उत्तम काव्य आहे असें वाटतें

## २७ बल्लवदूत



एका पुत्राकडुनि अपुल्या दोष कामांत झाला
तेणें त्याच्या अदय जनका कोप अत्यंत आला
बोले " मूढा प्रणय करितां नित्य नापास होशी "
त्या कांतेचा विरहचि अतां वर्षपर्यंत सोशी !

*   *   *

ऐशा काळीं कुशल अपुलें स्त्रीप्रती पाठवाया
योजायीलें सहृदय सयें बल्लवातें स्वयाच्या
प्रेमार्वांच्या सुळिहि न मनीं राहतोसे विवेक
आचारीही प्रियजन तया वाटती कैंचि देव !
" आंबेवाडी जवळि दिसतें ' धी स्वदेशी सदन '
तेथोनीया भवन अमुचें उत्तरेलागिं सान
काळ्या रंगीं बहुत चमके भिल्लनारीप्रमाणें
दृष्टीला तें दुरुनि पडतें थेंदिया कारणानें,
ज्याच्या बागेमधिं विलसते बाल ऐशी कण्हेरी
मत्कांतेनें निशिदिनिं जिला पाळिलें आजवेरी

भिंताडाच्या वर बहर तो लागलासे तयाचे
हातीं येती सहज अगदीं गुच्छ भारी फुलांचे !
दारीं ओटीवर बसतसे आमुचा श्वान मोत्या
ऱ्यावें त्यातें मुळि न बहु हो तो मवाळ प्रकृत्या.
होई मंजु ध्वनि हलुनियां बांगड्या पांच सात
ऐशा ताली शिकवि रमणी यदि घेण्या सुखांत !
ती यावेळीं तर मजविणें फार आहे विलोल
होई कॉफी सुमधुर कशी साखऱ्यावीण बोल
नाहीं शक्ती मुसळ धरण्या तंदुला कांडण्यास
रांगोळीला निमुलचि असे वा सदा घालण्यास. "

ना. गं. लिमये

## २८ आम्ही कोण ?

'आम्हीं कोण ? ' म्हणून काय पुसतां दांताड वेंगाडुनी ?
'फोटो' मासिक पुस्तकांत न तुम्हीं कां आमुचा पाहिका ?
किंवा 'गुच्छ' 'तरंग' 'अंजलि' कसा अद्यापि ना वाचिला ?
चाले ज्यावरती अखंड स्तुतिचा वर्षाव पत्रांतुनी ?
ते आम्ही—परवाङ्मयांतिल करूं चोरून भाषांतरें,
ते आम्ही—न कुणास देऊं अगदीं याचा सुगावा परी !
डोळ्यांदेखत घालुनी दरवडा आम्ही कुबेराघरीं !
त्याचें वाग्धन वापरून रुपयूं हीं आमुचीं लक्तरें !
काव्याची भरगच्च घेउनि सदा काखोटिला पोतडी,
दावूं गाउनि अमुच्याच कविता आम्हींच रस्त्यामधें,
दोस्तांचे घर बैसवून करुं या आम्ही तयांचा 'उदे' !
दुष्मानावर एकजात तुटुनी कीं ओरबडूं चामडीं,
आम्हांला वगळा—गतप्रभ झणीं होतील साप्ताहिकें !
आम्हांला वगळा—खलास सगळीं होतील ना मासिकें !

केशवकुमार

# हुकमे हुकूम

( साकी )

करमत नव्हतें म्हणुनि एकदां असाच गेलों रानीं
वसंत का-परि ऋतु दुसरा कधिं कुणीं पाहिला कवनीं !
समोर होता झाडावरतीं एक चिमुकला पक्षी
बोलुनि चालुनि कवि पडलों मी सहजचि त्याचा लक्षी
वसंत ऋतु तो; रम्य वनहि तें पक्षि आणि कविराय
तुम्हीच सांगा रसिका आतां हवें आणखी काय ?
सत्वर कविच्या रसिकपणानें सांगितलें त्या गाया
नवल वाटतें सांगाया परि-कीं तें गेलें वांया
" वृक्षावरच्या माझ्या मित्रा, कांहीं गाणें गाच
गमतीखातर आणि जरासा इकडे तिकडे नाच
बंधु तुझा मी-माझ्यासाठीं गळ्या लाग तूं गाया
हे बघ देतों कण धान्याचे कांहीं तुजला खाया.
स्तुति गाण्याची तुझ्या बहुपरी करिन चारचौघांत
चित्रहि आणिन तुझें कशाच्या तरी खास अंकांत
गाण्याची या तुझ्या शिफारस करूं अशी भरपूर
कीं, शाळाखातेंही घेइल करील तें मंजूर. "
अशा प्रकारें फार विनविलें जीव तोडुनी साच
भिकारडें तें कांहीं केल्या परंतु ऐकेनाच
गा म्हटल्या जो गात नसे त्या सृष्टीचा कवि म्हणतीं
मस्तक फिरलें हातपायही रागानें थरथरती.
" एक मारितों दगड असा कीं पडेल पांसुनि चोंच "
म्हणुनि वांकलों तसाच खालीं आवेशानें तोंच—
लगबग दिसले स्नेही माझे-संपादक त्या-हाचे
म्हणूं लागले " भले ! तुम्हांला कुठें कुठें पाह्यचें !
या अंकाचा चालू तक्त ( फर्मा ) होत नाहिं भरपूर
कमाचा खोळंब्या झाला द्या कांहीं " मजकूर "

वसंत-अंकीं वसंतवर्णनपर कविता चालेल
परंतु झटदिशिं करा, नातरी काम उगीच लांबेल.
सरासरी या खरडुनि ओळी अठरा पासुनि वीस
ऐकिलें न हें तों कवनाची झाली स्फूर्ति कवीस.
झाडावरचा पिसाट कवि तो तसाच वळुनि रानीं
घला रसिकहो लांबी रुंदी नीट ठेवुनी ध्यानीं.
वसंतकाळीं त्या वर्णाया वनांतुनी माघारी
गोविंदाग्रज ववीश्वराची घरीं परतली स्वारी.

गोविंदाग्रज

## ३० पाहुणे

( केशवसुतांची " दवाचे थेंब " ही कविता वाचल्यानंतरच पुढील विनोदी कवितेचें रहस्य लक्षांत येईल )

" कोठुनि हे आले येथें ?
काल संध्याकाळीं नव्हते ! !–"
पाहुणे पसरले ओटी—
वरि बघुनी आज प्रभातीं
आईला बाल्या वदला
कुतुकानें उत्सुकलेला.
" दिसती हे कोणी आले
आपुल्याच भाग्यामधले !
आई ग ! तर वद मातें
कोठुनि हे आले येथें ?
तंबाखू पानें खात
कसे पहा बदबदतात !
उघडुनी दया ग भयुग्न
राजरोस करिती हल्ला !

घावांच्या पेटींतुन गे
पळविती विड्यांचे चुडगे !

मौज मला यांची वाटे
होतें हे तर वद कोठें ? "

" हं इकू बोल–" तनयातें
वर करुनी बोट वदे ते–

" कावळे गिधाडें घारी
येती हीं जेथुनि सारीं,

ढोंगळे, डांस, घुंगुरटीं
वाळारे, जेथुनि येती,

खोकला, ताप हीं दुखणीं
आपणास येती जिथुनी,

तेथुनीच आले येथें
हे छळावया आम्हांतें ! "

" राहतील येथें का ते ?
अडवितील का ओटीतें ?

करतिल का भिंतीवरती
ही अशी लाल रंगोटी

जातील कधीं हे आई ?
घरदार न यांना काहीं ? "

" नाहीं रे ! ते इतुक्यांत
जाणार गड्या नाहींत !

जोंवरी भीड आम्हांतें
जोंवरी लाज ना यांतें,

जोंवरी अम्हा बाजार
सारखा इथें टिकणार !

# २१ कादरखां




हा कोण इथें पडलेला । 'कादरखां काबुलवाला' ॥ ध्रु० ॥
धिप्पाड देह हा अडवा । पसरला सहा अन् फूट !
पालथे पलिकडे पडले । विशाळ खिळ्यांचे बूट !
चुणिदार चोळणा आतां । फाटून होय चिरगूट !
बैसला पठाणी पडगा । बाजूला दूर निमूट !

चिखलांत बुडाले कल्ले !
त्या ओढिति चिल्लेंपिल्लें !
खिसमीस खिशांतिल उरलें

कुणि मारि तयावर डल्ला । 'कादरखां काबुलवाला'
अफगाण दऱ्यांतिल आतां । डुरकाव्या फोडिति शेर !
बुरख्यांतुनि कंदाहारी । उठलासे हाहाःकार !
तो शर्बत पीतां पीतां । दचकेल मध्येंच अमीर !
'क्या हुवा !' ओरडुनि ऐसें । बडवितात सगळे ऊर !

ते हेरतचे अक्रोड
ते बदाम-पिस्ते गोड,
रडरडुनी होती रोड !

अल्लबुखार अंबुनि गेला । 'कादरखां काबुलवाला'
तो हिंग काबुली आतां । विकणार यापुढें कोण ?
व्याजास्तव बसुनी दारीं । गरिबांचा घेइल प्राण ?
खाणार कोण या पुश्तीं । तीं कलिंगडें कोरून ?
सजवील नूर नयनांचा । कीं सुरमा घालुनि कोण ?

रस्त्यावर मांडुनि खाट
हुक्क्यासह मारिल थाटा—
हिंडेल कोण या आतां
घालून घमेलीमाळा ? । 'कादरखां काबुलवाला'
करुं नका गलबला अगदीं । झोंपला असे हा वीर !
जन्मांत असा पहिल्यानें । पहुडला शांत गंभीर !
राहणें जितें, जर मागें । व्हा दोन पावलें दूर !
हा बसेल मानगुटीला । ना तरी होउनी पीर !

जा पळा–पंचनाम्याला
तो आला ढगलेवाला,–
अडकवील कीं साक्षीला,
मग म्हणाल पुरतां भंवला । "कादरखां काबुलवाला"

केशवकुमार

## स्वाध्याय

श्री. निरंतर याचा 'जोत्स्ना' या पुस्तकातील पॅरडीवरील लेख, व प्रो. जोग यांनीं आपल्या 'अभिनवकाव्यप्रकाश' या पुस्तकात केलेलें विडंबन-काव्यावरील विवेचन वाचा

२७. चलुबदूत. मेघदूताचें कोणतेंही मराठी कवितावद्ध भाषांतर घेऊन त्यातील यक्षमंदिराचें दर्शन आणि ही कविता यातील कल्पना व वर्णनें

ताडून पहा कालिदासाची वर्णनपद्धती व ही पद्धती किती सारखी वाटते तें पहा

८ आम्ही कोण केशवसुताची 'आम्ही कोण' ही कविता वाचा. इतर दुसऱ्या आधुनिक कवींनीं कवीचा मोठेपणा दाखविण्यासाठीं लिहिलेल्या कविता वाचा म्हणजे श्री. केशवकुमार यास हें व्यंग काव्य लिहिण्याची का आवश्यकता वाटली तें तुम्हाला समजेल

९. हुकमे हुकूम गोविंदाग्रजांच्या इतर विनोदी कविता वाचा व त्यात आणि या व्यंग काव्यात काय फरक आहे तो पहा

१०. पाहुणे केशवसुताची 'दवाचे थेंब' ही कविता वाचा आणि त्या कवितेंतील करुण कल्पना समजावून घ्या कवीनें या व्यंग काव्यांत कशाचें विडंबन केलें आहे ?

११. फादरखां श्री माधवराव काटदरे याच्या याच पुस्तकात पान ८८ वर दिलेल्या 'गोकलखा' या कवितेशीं ही कविता ताडून पहा पठाणाचा वेष व त्यासंबधीं कोणत्या कल्पना व वस्तू कवीनें वर्णिल्या आहेत तें पहा क्षुल्लक गोष्टींना अतिशयोक्तिपूर्ण महत्त्व दिल्यामुळें विनोदाची निर्मिती होते हें त्यावरून तुमच्या लक्षात येईल.

---

# ५ भाषांतरित कविता

भाषांतर कीं रूपांतर' असा एक मनोरंजक वाद पूर्वी मराठी नियतकालिकातून काहीं दिवस चालला होता आणि तो शेवटीं अनिर्णीतच राहिला परराष्ट्रीय वाङ्मयांतील तत्त्वग्रंथ, नाटकें, कादंबऱ्या, गोष्टी, कविता आपल्या वाङ्मयांत उतरतांना मुळास धरून भाषांतर करावें, कीं त्यांतील विषयाचें स्वरूप बदलून, तत्त्वांना मुरड घालून, त्यांतील काहीं गोष्टींस अजीबात फांटा देऊन किंवा स्वतःच्या विचारांची भर घालून रूपांतर करावें हा वादाचा मुख्य मुद्दा होता आणि समाजाच्या किंवा व्यक्तीच्या मनःस्थितीचीं चित्रें रंगविणारीं कथात्मक पुस्तकेंच तत्कालीन लेखकांच्या नजरेपुढें असल्यामुळें समाजाच्या अभिरुचीप्रमाणें व संस्कृतीप्रमाणें फेरबदल करून

रूपांतर करावें असाच बहुतेक लेखकांचा व वाचकांचा अभिप्राय पडला. इंग्रजी कवितांचीं समग्र बिनचूक भाषांतरें करण्याचा कोणी विशेष प्रयत्न केला नाहीं किंवा अट्टाहास धरला नाहीं. कारण भावनाप्रधान कवि लेखनाच्या ओघात स्वतःचेंच विचार मांडीत व मूळ कवितेची फक्त एकच ओळ अवतरणरूपानें शिल्लक राही.

ज्या ग्रंथाचें भाषांतर करावयाचें त्याच्या कर्त्याची किंवा त्यात विवेचिलेल्या विशिष्ट समाजाची किंवा काळातील मतें यांची ओळख करून देणें हा जेव्हां प्रमुख हेतु असतो, तेव्हां असलबरहुकूम भाषांतर करणें हेंच भाषांतरकाराचें प्रमुख कर्तव्य असतें. अशा या भाषांतरामुळें मूळ मताची तर संपूर्णतया ओळख होतेच, पण त्याचबरोबरच लेखकाच्या लेखनकलेचाहि उत्कृष्ट परिचय होतो. मात्र भाषांतरकाराचें दोन्ही भाषावर प्रभुत्व पाहिजे.

भाषांतरकाराचें दोन्ही भाषांवर प्रभुत्व, त्याचप्रमाणें प्रतिपाद्य विषयाचें सांगोपांग ज्ञान-हीं असल्याशिवाय भाषांतर सरस उतरत नाहीं; व मूळ ग्रंथाला सोडून असून भाषांतरांत गोड लागलें तरी तें भाषांतर कनिष्ठ दर्जाचें समजणें भाग पडतें. रशियन, फ्रेंच लोकांचे वाक्प्रचार व चालीरीती इंग्रजी भाषांतरांत न बदलल्यामुळेंच मूळ ग्रंथाचा आस्वाद तर्जुम्यात घेता येतो.

संस्कृत, बंगाली, गुजराथी, हिंदी, उर्दू, पर्शियन व इंग्रजी कवितांचीं भाषांतरें मराठीत झालीं आहेत. संस्कृत किंवा तद्भव भाषातील भाषांतरें तर मराठीत पुष्कळच झालीं आहेत. त्यांपैकीं कांहीं कवितांत संस्कृत शब्द जसेचे तसेच ठेवणें किंवा सुबोध मराठी भाषेत भाषांतर करणें पुष्कळांना सुलभ गेलें. त्याचप्रमाणें वृत्तें दोन्ही भाषांत तींच असल्यामुळें मेघदूत, गंगालहरी, अन्योक्तिसंग्रह वगैरे कविता समवृत्तात किंवा समसंख्यात्मक श्लोकांत करणें शक्य झालें

मूळ ग्रंथकाराचे विचार, कल्पना व वाक्प्रचार तंतोतंत दुसऱ्या भाषेंत उतरविणें ही अत्यंत अवघड कला असून, स्वतंत्र ग्रंथलेखनाइतकेंच अशा भाषांतरांस महत्त्व असतें.

**३२. समुद्रवर्णन.** ( रघुवंश ) श्रीरामचंद्र रावणवध करून सीतेसह कुबेराच्या पुष्पक विमानात बसून अयोध्येकडे येण्यास निघाले, त्यावेळीं लंकेचा किनारा

सोडून भरतखंडाचें दक्षिण टोंक गांठीपर्यंत त्यांना जें समुद्राचें दृश्य दिसलें त्याचें हें वर्णन असून तें अत्यंत हृदयंगम आहे. यांत कालिदासाच्या कल्पनांची भरारी तुम्हांला दिसेल, समुद्राच्या पृष्ठभागाचें, प्रचंड जलचरांचें, रमणीय समुद्रकिनाऱ्याचें वर्णन यांत तुम्हांला सांपडेल. पण विशेष मौजेची गोष्ट ही कीं, समुद्राचीं इतर वर्णनें किनाऱ्यावरून किंवा समुद्रपृष्ठावरून केलेलीं असल्यामुळें, विमानांतून कसें दिसत असावें याचें कल्पनेनें रचिलेलें हें वर्णन खरोखर किती बिनचूक आहे याचो साक्ष पटून कालिदासाच्या प्रतिभेचें कौतुक करावेंसें वाटतें. विमानांतून घेतलेलीं छायाचित्रें तुम्ही पाहिलीं असतील, त्यावरून तुम्हांलाहि ही कल्पना येईल.

खालीं दिलेल्या कल्पना किंवा ओळी पहा.

'सेतुमुळें दुभंगलेला समुद्र आकाशगंगेप्रमाणें भासतो.'

'उंच तरूंची रांग सूक्ष्म दिसते.'

'बाटे चक्रचि लोहनिर्मित असें मोठें पुढें विस्तृत
सारे शुभ्रतटीं परंतु दिसतें मालिन्य रेखान्वित.'

पोवळ्यांच्या वेलांत अडकलेले शंखजीव, पाण्याचीं कारंजीं उडविणारे देवमासे, उड्या मारणारे वेगवान् नक्र यांच्या वर्णनावरून कालिदासाचें निरीक्षण किती सूक्ष्म असेल याची कल्पना येईल.

ओठांना नेहमीं पोवळ्यांची उपमा देतात. ज्या वस्तूस उपमा द्यावयाची तें उपमान व ज्याची उपमा द्यावयाची तें उपमेय. उपमेय हें नेहमींच्या परिचयाच्या सर्वसाधारण वस्तूंपैकीं वापरलें जावें. मग दूर असलेल्या पोवळ्यांना उपमान कल्पून सीतेच्या ओठांची उपमा देण्यांत कालिदासानें किती रसिकता व्यक्त केली आहे, हें पाहून तुम्हांला आनंद वाटेल.

आता दुसऱ्या दोन ओळी पहा.

'होई दूर पदोपदीं अपुलियापासोनि जो सागर
त्यांतोनी निघते सकानन कशी पृथ्वी पहा सत्वर!'

दुरून अस्पष्ट दिसणाऱ्या देखाव्याकडे वेगानें गेलें तर त्यांतील वस्तु जास्त स्पष्ट होतात व ती वस्तु आपणाकडे धावत येत आहे असें वाटतें. समुद्रातून वृक्षविपुल पृथ्वी बाहेर आली असें वाटणें साहजिक आहे; पण विमानांतून प्रवास करण्याची संधि मिळाली नसतांहि कालिदासानें तें केवळ कल्पनेनें कसें जाणलें हें मोठें गूढ आहे.

शाकुंतल नाटकात मातलीच्या रथातून आकाशमार्गानें पृथ्वीवर उतरताना
प्यत राजा असेंच उद्गार काढतो.

' शैलाग्रें उफळून तेथुनि धरा जाई गमे खालती
शाखा होउनि व्यक्त वृक्षहि दडी पानातली सोडिती
सूक्ष्मत्वें नयनां अगोचर नद्या, विस्तारतां दृश्य या
देतो कीं, वर कोणि हा मजकडे भूगोल फेकोनिया !'

महाराष्ट्र शाकुंतल, अंक ७, प्रवेश १.

कालिदासाच्या कल्पनाचा आस्वाद घेणें भाषांतरकाराच्या कर्तबगारीमुळेंच
केवळ शक्य झालें यावरून भाषांतराचें महत्त्व तुमच्या लक्षात येईल.

३३. द्राक्षकन्या वर सांगितलेली भाषांतराची निष्ठुर कसोटी लावून पाहिली
तर सकृद्दर्शनीं मनोहर वाटणारीं भाषांतरें दुय्यम दर्जाचीं ठरतात. याचें
प्रत्यंतर उमरखय्यामच्या रुबायाचीं मराठींत झालेलीं भाषांतरें ताडून पाहिलीं तर
तावडतोब कळून येईल

उमरखय्याम ( उमर बिन् इब्राहीम् अल्खय्यामी ) हा खुरासान प्रांतात निशापूर
शहरात अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला असावा यानें रुबाई वृत्तात
( जींत बहुधा पहिली, दुसरी व चौथी या पक्तींच्या अतीं व क्वचित् चारी
पक्तींच्या अतीं एकच यमक साधलेलें असतें अशा विशिष्ट वृत्तांतील चतुष्पदीस
रुबाई म्हणतात ) लिहिलेल्या कविता आवडल्यामुळें एडवर्ड फिजरल्ड या हौशी
इग्रज कवीनें त्याचें स्वतत्र रूपातर इग्रजींत केलें

या रूपातराविषयीं प्रो माधवराव पटवर्धन म्हणतात, " फिजरल्डनें मूळ
सुभाषितवजा विटाळ्याच्या शेंकडों रुबायातून सुमारें पन्नास अखड रुबायाची,
व इतर थोड्या स्फुट श्लोकार्धाची व चरणाची निवड करून जुळणी केली
आणि शब्दश पाहिल्यास अगदींच शिथिल, पण स्वतत्रपणें वाचिल्यास
अभिनव, सरस, चटकदार असें भाषातर तयार केलें "

प्रो माधवराव पटवर्धन यानीं सुद्धा मूळ पुस्तकावरून एक भाषातर प्रसिद्ध केलें
आहे समवृत्तात भाषातर करून थोड्या शब्दात सपूर्ण व मूळ अर्थ आणण्याचा
त्यांचा त्यातील प्रयत्न यशस्वी झाला खरा, पण सामान्य इग्रजी वाचकास ब्राउनिंगची
कविता जशी दुर्बोध वाटते तशीच भाषेचा खरा व्यासग नसलेल्या, व परदेशांतील

कथा व स्थळें यांच्या उल्लेखांनीं मुजून जाणाऱ्या सामान्य मराठी वाचकांना हें भाषांतर क्लिष्ट वाटूं लागलें.

तरी पण प्रो. पटवर्धनांनीं फुलांचीं नांवें, इतर क्लिष्ट विशेष नांवें, अरबी ऐवजीं संस्कृत अवतरणें घालून, भाषांतर यशस्वी करण्याचा प्रयत्न केला आहे.

उमरखय्यामचे विचार नैराश्यपूर्ण आहेत. बहुतेक रुबाया याच विचारानें भरलेल्या आहेत. प्रो. पटवर्धनांनीं फिजरल्डच्या रूपांतराचें शब्दशः भाषांतर 'द्राक्ष-कन्या' या नांवानें १९३१ सालीं प्रसिद्ध केलें. त्यांतील कांहीं निवडक रुबाया प्रस्तुत पुस्तकांत घेतल्या आहेत.

**फार्सी मूळ रुबाई**

गूयन्द मरा कि सूर बा हूर खुशस्त्
मन् मी गूयम् कि आबि अङ्गूर खुशस्त्
ईं नक्द बिगीर दस्त अज़् निस्य बिदार
कावाज़ि दुहुल् शनीदनज़् दूर खुशस्त्

गद्य भाषांतर—ते मला सांगतात कीं हुरींच्यासह उत्सव हा गोड असतो. मी म्हणतों कीं द्राक्षांचें पाणी गोड असतें. ही रोकड घर, आणि उधारीपासून हात मागें घे. कारण ढोलाचा आवाज दुरूनच ऐकणें गोड असतें. (प्रो. पटवर्धन)

**मूळ फार्सीयरुन भाषांतर.**

माधवराव पटवर्धनकृत :—

म्हणति "हुरींसह उद्यां महोत्सव गोड"
मी म्हणतों "अजि हा द्राक्षासव गोड"
घे ही रोकड, उधार ती सोडुन दे,
गमे दुरूनच कीं दुदुभिरव गोड.

ज. करंदीकरकृत :—

'ईदन्' बाग जरी 'परी' बहुल ती स्वर्गातली लोभवी
आहे खूप खरी पुराण मदिरा ऐसें मती बोलवी;
स्वीकारीं न कधीं उधार चतुरा, हातीं धरी रोख तूं,
ढोलाचा ध्वनि तो दुरून श्रवतां त्याची खरी थोरवी.
(रत्नाकर—नोव्हेंबर १९२८)

सामान्य मराठी वाचकास मूळ पार्शीशी ताडून पहाणें शक्य नसल्याकारणानें त्याच्या परिचयामुळें दुसरें भाषांतर मोहक वाटतें

आतां फिट्झरल्डच्या इंग्रजी रूपांतराशीं ताडून पहाणें बहुतेकांना शक्य असल्यामुळें ततोतंत भाषांतर व शक्यतोंवर मूळ ग्रंथकाराची विचारसरणी कोणी कायम ठेविली आहे, तें ताडून पहा.

'सुख स्वर्गाच्या आशेत नाहीं व साम्राज्याच्या उपभोगात नाहीं, तर मग रोख सुख कशात आहे ?' ही उमरखय्यामची शंका !

**फिट्झरल्डचें रूपांतर :—**

' How sweet is mortal Sovereignty ! '—
think some :
Others—' How blest the paradise
to come ! '
Ah take the Cash in hand and
waive the Rest;
Oh, the brave Music of a *distant*
Drum !

माधवराव पटवर्धनकृत भाषांतर :—

कुणि म्हणती, " भावी स्वर्गी खरा प्रसाद ! "
कुणि, " मर्त्य-राज्य पण किति मोहक हा स्वाद ! "
हा ! उचला रोकड, जाऊ या बरकड तें,
गंभीर गोड तो दुरुनच दुदुंभिनाद !

अ. ज. करंदीकरकृत :—

नृपपद—मधु मर्त्यी मोहवी राजसाना
सुभग सुरपुरीची आस ती सात्विकाना
अभिमुख सुख घेई शेष सारें त्यजून
स्वनित सुखद इंदु, दुदुभीचें दुरून

('विश्ववाणी'वरून)

## ३२ समुद्रवर्णन

" सेतूनें अपुल्या विभक्त, मलयापर्यंत सागर पहा,
सीते ! दृष्टिस फेनिलांबुधि किती वाटे तरी रम्य हा !
शुभ्राकाश शरद्‌ऋतूंतिल जसें तें चार तारायुत
स्वर्मंदाकिनिनें द्विधाकृति दिसे, हा तेंवि गे शोभत.
एकाची समयीं पहा बदलती याच्या अवस्था किती !
आहे थोर तसाचि हा, दशदिशा याचीं जळें व्यापिती,
रूपाचे विविध प्रकार, न तशी व्याप्ती तयाची कळे,
साक्षाद्विष्णुपरी न रूप सखये ! याचें कुणा आकळे.
मोठाले, बघ, ते नदीमुखीं किती मासे विशालाकृति !
यावें तोय सजंतु तेंय म्हणुनी आ फाडुनी बैसती,
त्या तोयें भरता हळूच मिटती जैसे मुखा सत्वर
कानीं उडती कशीं बघ शिरोरंध्रातुनी तीवर !
घेती केंवि उड्या अलक्षित पहा हे नक्र नागाकृति !
फेसातें करुनी विभिन्न अपुल्या दोन्हीकडे यांकितो,
ते कांते ! उडतां जसा विखरतो त्याच्या कपोलावरी
कर्णीं शोभवुनी दिसे क्षणभरी गे चामराचे परी !
मोठी लाट, तसेच देह दिसती यांचे नसे अंतर,
भक्षाया अनिला भुजग निघती येवोनि कांठावर·
*सूर्याचीं किरणें फणस्थ मणिच्या ठायीं जरीं पिंवती,*
तैसा निश्चय होत कीं पसरला येथें फणींचा पति,
कांते ! शंखसमूह वाहुनि कसा येतो तरंगाचिया
येथें विद्रुमसंधि, जो स्मितसे ओष्टापरी तूझिया,
शाखांचीं, बघ, तीं मुखें अडकुनी जाती तदीयांकुरीं
तेणें क्लेश पडे विशेष निघण्या, तेथून त्यांतें दुरीं
प्याया वारि घन प्रवृत्त सखये ! झाला न तोंची पहा
वेगानें फिरवी कसा गरगरा त्यातें महावर्त हा,

हें पाहोनि खरोखरीच गमतें कीं मंदराख्याचलें—
कांते ! काय समुद्रमंथन पुन्हां व्हाया अजीं लागलें !
कांठीं ताल तमाल उंच तरुंच्या राजी पहा शोभती,
दूरोनी अति सूक्ष्म ती दिसतसे नीला वनांची तती;
वाटे चक्रचि लोहनिर्मित असे मोठें पुढें विस्तृत,
सारें शुभ्र तटीं परंतु दिसतें मालिन्य रेखान्वित !
वाळूमाजि विभिन्न शुक्तिमधुनी थोडींकडे प्रसृत—
मोत्यें तीं बघ, पूगवृक्षहि तसे जे कीं फलावर्जित—
आलों खास तटप्रदेशि सखये ! वेगें विमानाचिया,
कांहीं वेळ न लागला दुरनिया येथें अम्हां यावया.
मागें तूं वळुनी मृगाक्षि ! अपुल्या दृष्टीस फेंकी अतां,
कैसा मार्ग सुरम्य सर्व दिसतो मागील तो तत्त्वतां !
होई दूर पदोपदीं अपुलिया पासोनि जो सागर,
त्यांतोनी निघते सकानन कशी पृथ्वी पहा सत्वर

कृ. ल. पा.

## ३२ द्राक्षकन्या
### ( कांहीं उतारे )

ये, भर प्याला अन् कुसुमाकर—होळींत
वैराग्यवस्त्र तें फेक ऋतूंविल शीत,
नच दूर जायचें उडुनि काळपक्ष्याला
अन् पहा पंख निज हा राही मारीत

८७

या इथें तरुतळीं एक वही कवितेची,
भाकरी एक, अन् सुरई एक सुरेची,
आणखी एक तूं जवळ गात या विजनीं—
अन् हें न रान मग, नंदनवन तें ईंची !

वध दूं या पडक्या पडशाळेंत जुनाट,
जिम असती दारें दोनच हीं—दिन-रात,
सम्राटामागुन सम्राट् किति थाटांत
घडि दों घडि राहुन धरिती अपुली वाट !

जातात गढुन आजच्या जे व्यवस्थेंत,
वसतात या उद्यांचाच वेध जे घेत,
दोघांस वांग ये तिमिर-मनोऱ्यावरुनी—
" मूर्खांनो, तुमचें फळ न येथ, नच येत ! "

मी प्रश्न टाकिला अतीं भ्रांत नभास,
" दे कवण दीपिका मार्गदर्शिका त्यास
ठेचाळतात जीं मुलें तमीं त्या, नियती ? "
" आंधळी बुद्धि ! " हें उत्तर दे आकाश.

कीं एक दिनांतीं वचें फिरत मी हाटीं
कुंभार भिजवुनी तिंथी अपुली माती;
अन् क्षुण्ण तिभेनें ती पुटपुटली काहीं—
" हळु जपून भाई ! जपून हलक्या हातीं ! "

चल, भर, दे प्याला ! घोकुन काय हंशील
कशि घसरे वेळा-वाळू पायतळील !
मृत होय काल ती, उद्यां अजून अज्ञात,
जर आज गोड, किति त्यांची क्षिति करिशील ?

पण, वाद घालु दे त्या शाहण्यास हटेल,
जाउ दे प्रश्न जर विश्वाचा न सुटेल,



चल गोंधळात या कोनीं बसुन करू या
आपणास खेळवी त्याचाच मग खेळ

बघ आंतुन, बाहेरुन, भवतीं, वर, खालीं
हा निवळ तमाशा सारा मायाजाळीं !
अन् आपण छायाऽऽकृति ज्या येती जाती
आकाशदिव्यामधिं रविज्योतिर्भवतालीं.

या कृष्ण-धवल दिन-रात्रि-पटावर केवी
नर-नरदा घेऊन दैव केळीसुख सेवी !
त्यां इकडे तिकडे फिरवी, उगवी, मारी,
एकेक उचलुनी डब्यांत अंतीं ठेवी.

बघ चेंडु करीना कधिं 'हो-ना' ची बात,
खेळाडु टोलवी तिकडे राही जात;
तुज उजवी-डावीकडे दवडवी क्षेत्रीं
हें त्यासच सारें ज्ञात, त्यासच ज्ञात !

ती फिरती अंगुलि लिही, लिहीतच राही,
कर खर्च साधुता, सारी विद्वत्ताही,
पण मोह पावुन न पंक्त्यर्धहि खोडिल ती,
शब्दही न पुसला जाय अखिल बाष्पांहीं,

हा हाय ! गुलाबासंगें जाय वसंत,
अन् समाप्त हो मधुगंधियौवनग्रंथ,
अन् न कळे गाई विटपीं जो बुल्बुल तो
ये कुठून, जाई कुठें उडुन तो हन्त !

माधव ज्यूलिंद

## स्वाध्याय

३२ **समुद्रवर्णन** मूळ रामायणाच्या मराठी भाषांतरांतून, श्री रामचंद्रानें लंकेपासून अयोध्येपर्यंत केलेल्या प्रवासाचें वर्णन वाचा

फणींचा पति, समुद्रमथन, या शब्दांनीं कोणत्या कल्पना सूचित केल्या आहेत ?

विमानानें केलेली हिमालयाची प्रदक्षिणा, लंडन–ऑस्ट्रेलिया शर्यत यांचीं नियतकालिकांतून व वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेलीं व होणारीं विमानवर्णनें वाचा

३३ **द्राक्षकन्या.** प्रत्येक रुबाईत एक कल्पना व एक स्वतंत्र विचार गोवला आहे या कल्पनांचा विस्तार करा व विचारांचें विवेचन करा प्रो पटवर्धन यांनीं आपल्या 'उमरखय्यामकृत रुबाया' या पुस्तकास एक विस्तृत चर्चात्मक प्रस्तावना जोडली आहे, ती लक्ष्यपूर्वक वाचल्यास हें विवेचन करणें सोपें जाईल

केवळ सूत्रमय भाषेत हे विचार मांडल्यामुळें पहिल्या वाचनाचे वेळीं ते तुम्हाला समजणार नाहींत पण दोन तीन वेळां मननपूर्वक वाचल्यावर ते तुमच्या ध्यानीं येतील

क्षुण्ण = चूर्ण झालेली मधु = वसंत पडशाला = वस्तीची जागा बांग = प्रार्थनेसाठीं लोकांना मारलेली हांक

काळपक्षी, पडशाळा, नर–नरदा, चेंडू–खेळाडू या कल्पनांचा खुलासा करा

---

# ६ ऐतिहासिक कविता

महाराष्ट्र रसवतीच्या पहिल्या भागांतील पृष्ठ ७० वर केलेल्या विवेचनावरून ऐतिहासिक कवितेचें लक्षण काय हें तुम्हांला समजलें असेल त्याचप्रमाणें या पुस्तकांतील कवितांवरून त्यांतील कमोंनीत कोणती कविता किलपत उतरते हेंहि तुम्हांला कळलें असेल

ऐतिहासिक प्रसंगाचा आधार घेऊन तत्कालीन समाजव्यवस्था, देशस्थिति, लोककल्पना यांचें चित्र रंगविणाऱ्या, किंवा या विभाच्या पार्श्वभूमीवर ऐतिहासिक व्यक्तींचें चारित्र्य प्रकट करणाऱ्या, क्वचित् प्रसंगीं काल्पनिक प्रसंगांची किंवा व्यक्तींची भर घालून गूढ कथानक भडक रंगांत वर्णनाऱ्या अनेक वाङ्मयप्रकारांत विविधता आढळते ऐतिहासिक नाटक, कादंबरी, गोष्ट, खंडकाव्य, नाट्यगीत, स्थलवर्णन यांची भूमिका एकच असून स्वरूप व विस्तार निराळा असतो एवढाच काय तो फरक नागेश विनायक बापट, हरि नारायण आपटे, नारायण हरि आपटे, नाथमाधव, हडप, यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या, त्याचप्रमाणें इतर लेखकांनीं लिहिलेल्या रजपूत, मोंगल इतिहासावरील कादंबऱ्या आणि मध्ययुगीन प्रसंगांवरील कादंबऱ्या व गोष्टी वाचल्या तर या कादंबऱ्यांची ऐतिहासिक खंडकाव्यें किती उच्च प्रतीचीं झालीं असतीं याची कल्पना येते. त्या तुलनेनें पाहतां आतांपर्यंत प्रसिद्ध झालेलीं ऐतिहासिक काव्यें दुय्यम दर्जाचीं वाटतात ठराविक पद्धतीनेंच काव्य लिहिलें पाहिजे हा दंडक कदाचित् या कवींना जाचक झाला असावा स्कॉट कवीचें 'लेडी ऑफ दी लेक' किंवा 'मारमियन,' 'लेज ऑफ दी लास्ट मिनिस्ट्रल' (शेवटच्या शाहिराचीं गाणीं) हीं ऐतिहासिक काव्यें इंग्रजी काव्याचा अभ्यास करणारांना फार आवडतात

ऐतिहासिक कालातील वातावरण उत्पन्न करणें, ऐतिहासिक व्यक्तीच्या कृतीवर नवीन प्रकाश पाडणें, त्याच्या मनोव्यापाराचें किंवा चरित्राचें स्वकल्पनेनें आविष्करण करणें हें ऐतिहासिक वाङ्मय निर्माण करणाऱ्याचें ध्येय असतें आणि तें कितपत साध्य झालें आहे तें पाहून त्याच्या वाङ्मयाचा दर्जा ठरवावयाचा असतो स्कॉटच्या कादंबऱ्या व काव्यें, अलेक्झांडर ड्यूमाच्या कादंबऱ्या, कांहीं हिंदी व बंगाली कादंबऱ्या (मूळ किंवा भाषांतरित) तुम्हीं वाचल्या तर या विधानाची तुम्हांला प्रचीती येईल

या विभागात घेतलेल्या तीन कविता तीन प्रकारच्या आहेत

३४ **गोकलखां** :—कोरेगावच्या लढाईंत विजयश्रीनें माळ घातली असूनहि मराठी सैन्यानें पलायन केलें व मराठेशाहीच्या शेवटच्या सेनापतीनें अष्टयाच्या लढाईचे प्रसंगीं धारातीर्थी देह ठेवला ती वेळ अतिशय आणीबाणीची होती मराठी राज्याचा खरा अस्त लवकरच झाला! सर्वत्र स्थिति इतकी विस्कळित झाली होती.

की बापू गोखले जिवत राहिले असते तरी भवितव्य टळलें नसतें असा प्रसंग निवडून काढण्यात कवीनें मार्मिकता दाखविली आहे त्यावेळच्या राजकीय स्थितीचें मोजक्या शब्दांत रेखाटलेलें हें चित्र किती यथातथ्य आहे !

शोकरस आठवणाऱ्या ह्या चार्लीतील कवनांत, करुण, भयानक, विषाद इत्यादि मनोवृत्ति जागृत करण्यात कवीनें किती यश संपादिलें आहे तें पहा. कविता मनातल्या मनात वाचा आणि आपली क्षणभर कशी तल्लीन वृत्ति होते तें पहा. कवि माधव यांनीं पोवाडे, बखरी व ऐतिहासिक कागदपत्रें यांचा अभ्यास केला असून शब्द, वाक्प्रचार, ऐतिहासिक प्रसंग त्या सामुग्रीतून निवडून, काव्यौघास प्रतिबंध होणार नाहीं अशा युक्तीनें त्याची पेरणी जागोजाग केली आहे, असें तुम्हांला अध्ययनानें समजून येईल

गोक्लखा, लढनेवाला, शौर्याची शर्थ करून हे शब्द तुम्हाला बखरींत सापडतील.

स्फूर्ति व अभ्यास यांच्याशिवाय चांगली कविता निर्माण होत नाहीं, हें जितकें खरें, तितकेंच जी कविता पुन्हां पुन्हां वाचल्यावर जास्त जास्त सौंदर्यस्थळें प्रतीत होतात किंवा आनंद द्विगुणित होतो, तीच काव्यकृति उच्च दर्जाची असते हें तत्त्व खरें आहे

**३५ जंजिरे विजयदुर्ग ऊर्फ घेरिया** 'हिरवें तळकोंकण' (महाराष्ट्र रसवती भाग पहिला, पृष्ठ ४२) या कवितेंतील कोंकणच्या किनाऱ्याचें, तेथल्या लतावृक्षांचें सरस वर्णन तुम्हाला खात्रीनें हृदयंगम वाटलें असेल कवीच्या कल्पनेच्या भराऱ्या, लोकगीतांचा व दंतकथांचा उपयोग करण्याचें चातुर्य, आणि यथातथ्य वर्णनाचा काटेकोरपणा तुमच्या लक्षांत आला असेल

मराठ्यांच्या गतकालीन वैभवाचा अभिमान, मराठी आरमाराचे अधिपति आंग्रे यांचेबद्दल आदर, या कोंकणनिवासी कवीच्या मनात वसत असून तत्कालीन वाङ्मयाचा व परिस्थितीचा त्याचा गाढ अभ्यासहि स्पष्ट दिसतो त्याची निरीक्षणशक्ति सूक्ष्म आहे या कालांतील काव्यमय भाग बिनचूक निवडण्याची व त्यावर काव्याचें लेणें चढविण्याची हातोटी वखाणण्याजोगी आहे

**३६ दानशरवाडा** पहिल्या बाजीराव पेशव्यानीं हा वाडा एका शुभशकुनी जागेवर बांधला या वाड्यातून पेशवाईचीं म्हणजे जवळजवळ मराठी राज्याचीं सूत्रें

हालविलीं जात. नानासाहेब, थोरले माधवराव यांनी तेथूनच राज्यकार... चालविला. नारायणरावांचा खून येथेंच झाला. बारभाईंचीं कारस्थानें व सवा माधवरावाची वेडाच्या भरांतील आत्महत्या हे प्रकार येथेंच घडले.

दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या पलायनानंतर कंपनीसरकारच्या ताब्यांत ह वाडा आल्यानंतर, व यांतील इमारती आकस्मिक अग्निप्रलयानं भस्मसात् झाल्यावर न्यायाचीं कोर्टें कांहीं दिवस याच्या आवारांत होतीं.

महायुद्धानंतर या वाड्याच्या जागेत सार्वजनिक बाग तयार होत असतां जुन्या इमारतीचे आवशेष खणून काढले, व बाहेरील तट व दरवाजे यांसह हा भाग पुराणवस्तुसंशोधनखात्याच्या ताब्यांत गेला. समोरच्या पटांगणांत पूर्वी जेथें हत्ती, घोडे झुलत होते, तेथें नतर जुन्या मोडक्या वस्तूंचा चोरबाजार भरू लागला. आतां, नव्या पुलाचा रस्ता व युद्धस्मारक हीं झालीं आहेत.

ऐतिहासिक स्थलांचीं अशा तऱ्हेचीं स्थित्यंतरें सर्व हिंदुस्थानभर पाहण्यास सांपडतात. अशा स्थलांवर भावनाप्रधान कवींनीं कवनें रचलीं आहेत.

कवि गिरीश या शनवारवाड्याच्या तटाच्या एका फुटक्या बुरुजाजवळ बरींच वर्षे रहात असत. तेव्हां प्रतिदिनीं नजरेस पडणाऱ्या वाड्याच्या त्या शोचनीय दृश्यानें त्यांचें अन्तःकरण पिळवटून जाऊन अशा तऱ्हेची कविता निर्माण व्हावी हें साहजिकच आहे.

ऐतिहासिक स्थळें पाहून कवीच्या मनावर काय परिणाम होतो हें तुम्हांला 'रायगडावर काय आहे' (रसवंती भाग १, पृष्ठ ७७) या कवितेवरून कल्पना आली असेल. या कवीच्या मनावर कसा काय परिणाम झाला आहे त्याची तुलना करा.

हा कवि पराक्रमी पेशव्याची, शाहिराची, सैन्याच्या शौर्याची, मराठी राज्याच्या वैभवाची आठवण करून देतो. हल्लींची स्थिति पाहून त्याचा ऊर फाटतो, कंठ दाटतो. शेवटीं कवी म्हणतो :—

> 'कुणाला नाव ठेवावें नशीबा लावगें हात
> कुठें कोणाकडे पाहू निराशें जीव आतूर !'

कवि हतबुद्ध होतो, हळवळ होतो.

ही कविता नैराश्यपूर्ण परिस्थिति दाखविते, पण वाचकाला कर्तव्यप्रवण करीत नाहीं, पुढचा मार्ग दाखवीत नाहीं. ती केवळ भावना उद्दीपित करते. गिरीश कवींच्या

सामाजिक, ऐतिहासिक कवितेंतील हा ठळक दोष के. ना. काळे यांनी 'प्रतिभा' पाक्षिकांत 'फलभार' या त्यांच्या कवितासंग्रहाचें परीक्षण करितांना मार्मिक पण सौम्य भाषेंत दाखविला आहे.

## २४ गोकलखां—



हा कोण इथें पडलेला ?
" गोकळखां लढणेवाला ! "

स्वातंत्र्यसूर्य अस्ताला—पावला महाराष्ट्राचा,
अर्घ्य त्यास अर्पुनि ज्यानें—आपुल्या उष्ण रुधिराचा,
चढविला रक्तिमा रम्य—तद्बिंबावरती साचा !
शत्रूवरि पडला तुटून,—शौर्याची शर्थ करून,

समरांत वेचिले प्राण,
विदित तो नसे कोणाला—गोकळखां लढनेवाला ?

तिमिर तेज एके समयीं—वसतिल का त्याच ठिकाणीं ?
असिलता मांदणें दोन—शक्य कैसें एके म्यानीं ?
प्रभु दोन महत्त्वाकांक्षी—राहणें न हिंदुस्थानीं !
कलह घोर म्हणुनी माजे—युद्धाचा डंका वाजे !
वीरनाम संतत गाजे
वीर हा परी शेवटला !—गोकळखां लढनेवाला !

अष्ट्याच्या मैदानांत—लागला अखेर निकाल !
बंदुकीवरी मोघटले—जरी कराल तरि करवाल !
पाश्चात्य संस्कृतीपुढतीं—पौर्वात्य पद्धती फोल !
सडांचा गेला काल—स्वत्वाला विसरे ढाल—
भालेही कवडी मोल !
घायाळ होउनी पडला—गोकळखां लढनेवाला !

प्रेतांच्या जागोजाग—राशींवर पडल्या राशी !
रक्ताचें घडलें स्नान—अष्टयाच्या रणभूमीसी !
लोळल्या ध्वजा धूळींत—सुकुनियां पूर्वविभवासी
कोरडा कंठ होवोनी—घायाळ शिपाई कोणी—
करिताती 'पाणी ! पाणी !'
चावी परि अधरोष्ठाला !—गोकळखां लढनेवाला !

वीरोचित शय्येवरतीं—पहुडला पुन्हां न उठाया !
अरिला न ज्यामुळें निद्रा—तो सजला निद्रा घ्याया !

रक्ताचा वाहुनि पूर—ये दुर्बलता अनिवार !
म्लानीहि वारंवार !
दृढ तरी धरी खड्गाला ! गोकलखां लढनेवाला !

शेवटला आशातंतू—शेवटल्या श्रीमंतांचा,
अवशेष उग्र तेजाचा—निःशेष आज व्हायाचा !
हा अस्तंगत रवि-किरण—क्षणमात्रें लोपायाचा !
कोंपरें सुरे अंगाला—शत्रूच्या, घुसतां ज्याला;—
गृध्रांचा त्यांवरि डोळा !
चित्तीं न परी गडबडला—गोकलखां लढनेवाला !

इहलोकांतिल उत्कर्ष—हा दिव्य राजनिष्ठेचा !
हा अखेरचा कल्लोळ—दाक्षिणात्य शौर्याब्धीचा !
हा शेवटला उच्छ्वास—श्रीस्वतंत्रतादेवीचा !
आंचके अखेरिस आले,—एकदां शरीरहि हाले,—
पांढरे जाहले डोळे !
निष्प्राण होउनी पडला—गोकलखां लढनेवाला !

मर्दुमकी मेली सारी—वरपगडा अधमत्वाचा !
ही स्वराज्यनिष्ठा मेली,—सुळसुळाट घरभेद्यांचा !
विहगेश्वर विगतप्राण—कोलाहल काकोलांचा !
दुष्कृत्यफलां भोगाया,—मंदभाग्य बाजीराया !
हो तयार जन्मांतचि या !
आधार तुझा हा तुटला !—गोकलखां लढनेवाला !

खणखणाट तरवारींचा—आतां न पुन्हां व्हायाचा ?
यापुढें न भगवा झेंडा—कोठेंहि नाचायाचा ! !
समरघोष 'हरहर !' ऐसा—श्रवणीं न कधीं यायाचा !
शांतीचें बसलें ठाणें !—आतां न कधीं मैदानें
रंगतील नरकेसरीं !
समशेरबहाद्दर गेला—गोकलखां लढनेवाला !

संपला इथें इतिहास—शिवरायाच्या राज्याचा !
आतां न राहिला काळ—मर्दानी पोवाड्यांचा !
आटला झरा येथून—चैतन्ययुक्त वाणीचा !
अश्रूचें सरि मैदान स्फूर्तिप्रद गातें गान !
आठवतो तेथिल अजुन
वृक्ष-लता पाषाणांला—गोकुळसा लढनेवाला !

माधव

## २५ जंजिरे विजयदुर्ग ऊर्फ घेरिया

जांभ्या खडकांनरी काळवें, त्यांवरली खेंकडे
पहात फिरती जिथें हालत्या स्वप्रतिबिंबाकडे,
कमळमीन भयहीन उघडुनी निज पाकळिपाकळी,
नवल करीती कुर्मी रेखिल्या पुलिनीं रंगावली,
तेथें होता दुस्मानाला अखण्ड वितरनि भया,
दर्यावर दावीत दरारा विजयवंत घेरिया !
उत्तरेस 'आ' पसरुनि बसला प्रचंड रत्नागिरी
दक्षिणेस करवीरकरांची शिवलंका सागरीं;
मध्यें शोभे मरकतगिरिच्या मणिमय सिंहासनीं
सत्ताविस दुर्भेद्य गडांचा राजा तळकोंकणी !
दोन बाजुंला हुकमी बन्दे, शौर्यांचे सागर,
मर्द खडे यशवंत, देवगड वाराया चामर,
मध्यें विलसे घेर तिहेरी कोटाचा घालुनी
सत्ताविस रणमस्त दुर्ग्यांचा राजा तळकोंकणी !
प्रशान्त उत्तरतटीं पसरलें वैजयन्तिचें जळ
चाले दक्षिणतटीं जलधिची मडकांतुनि खळबळ;
पूर्वदिशेला खन्दक नेई आस अरीची लया
पश्चिमाब्धिवर दावि दरारा विजयदुर्ग घेरिया
रणफन्दी जरि खन्दि शिवन्दी बुर्जांबुर्जांवरी,
ठायीं ठायीं हेटकऱ्यांचा खडा पहारा वरी;

तटीं थटीं विशाळ धाविणी डोकावुनियां पुढें
उघडुनि जबडे नजर भयंकर लाविति दर्याकडे;
आज्ञेचा अवकाश, शतावधि धाप खडाखड उडे
निळ्या सागरीं निळाच पाउस सीमेपरता पडे !

गोलन्दाजी, बर्कन्दाजी गुणीं न अणुही उणा,
लोंबे पिटाळुनि दूर अनाहुत पाण्यांतिल पाहुणा !
राखित पहिलें द्वार उभा बजरंगवली मारुती,
दुसऱ्या द्वारावरुनि गर्जती साहेबी नौबती;
तिसऱ्या द्वारीं फरा सदोदित समशेरींचा उभा,
आंत राहिले धनि दुर्गांचे राखित कोंकणसुभा
पाणियांतल्या पातशाहांवर इथें राजकारण,
इथें रंगला दर्यावरला दावा रात्रंदिन !

चिरेबन्दि हा दारुखाना राखिति संत्री इथें
शस्त्रास्त्रांची विशाळ शाला ही इकडे शोभते,
मसले गोलन्दाज इथें हे चढवुनि जामानिमा,
करिती तोफा मना शत्रुच्या तिळहि न धरितां तमा !

सफेतरंगी कुसूं घालुनी सभोंवतीं लांकडी
आंत निर्मिली टेहळ्णीची ही इकडे टेकडी,
जळदुर्गांचे, स्थलदुर्गांचे, ध्वजवृन्दाचे धनी
येथुनि करिती दुर्बिणींतुनी दर्यांची पाहणी !

सर्लेलांची खरी निशाणी पांचजन्य जरि खुले,
वाल्कमन्दिर शिवशाहीचें निशाण येथें डुले !
डुले खालतीं दर्यांमन्ती आरमार सळ्वळा,
धवलपराचा स्वस्तिक मंडित फटकाचित पाहुटा !
संगरनौकास्तंभीं हळवा सफेत, हिरव्या, निळ्या,
यान्यावरतीं झिळमिळ झिळमिळ आनन्दी झिळमिळ्या !
गलबत, मचवा, फत्तेमारी मारुनि फत्ते करी
विजयदुर्गाची दर्यावन्ती यशवन्ती सागरीं !
सावधान ठिजरी सर्वदा रगरांची आगळे,

कर्णधार, तळवारबहादर भण्डारी आवले !
वलन्देज बुडवून झोडिले फराशीस फांकडे
प्रतिनौकेवर त्या विजयांचा अजुनि चौघडा झडे !
बळ दुबळें हें करावयाची धरिति वासना मनीं
शिवशाहीचे सेवक नाना प्रधान चूडामणि !

माधव

## ३६ शनवारवाडा

( गझल : वृत्त–वफ़त )

तुझ्या विच्छिन्न रूपाला बघूनी फाटतो ऊर
इकाळे जीव; अश्रूंचा स्मृतींनीं दाटतो पूर
तर्टच्या भंगल्या भिंती फुटोनि चौघरा गेला
जळाली वैभवें सारीं, निमाले छातिचे शूर
इथें तल्वार बाजीची विराजे, मस्त रंगेल
इथें झेंडा मराठ्यांचा उडे वाऱ्यावरी स्वैर
हिरीरी वीर भाऊची, मनींचा स्वेप घेतून
इटानें नाचवी घोडे कुरुक्षेत्रांत चौखूर
अरीला कांपवी भीती, इथुनी माधवी नीति
पुकारी पेशवाईचा दरारा भारतीं दूर
विसारी गारदी घाला निसारे मत्सरानींचे
विचारी युक्तिनीं सारें जहालें शांत कहूर
मराठेशाहिच्या मार्गे जरा होती तुझी आस
निमाली शाहसूनूची परी ध्येयें महाशूर
सभोंतीं फुर्फुरे घोडा, झुलावा हत्ति दारांत
तिथें का रान माजावें ! कुठें तो वैभवी नूर !
फवारोनी जिथें धारा रुपेरी सांडले बिंदू
तिथें हा पद्मकारंजीं विटांचा कोरडा चूर !
मराठी शूर मर्दांचे पवाडे गायिली वाणी
पुकारावें दिवाभीतें तिथें का काढुनी सूर !
स्मरावे काय जोखमीनीं फुटूनी काचवेंडूनी

नेमून दिल्यापासून, आबाऱ्याबाहेर राज्याचा विस्तार वाढल्यामुळें व पेशव्यांनीं कारभार हस्तगत केल्यापासून मराठी राज्याच्या अस्ताचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. पण कवींना अखेरचा वीर—निराशेंत जिवाचा होम करणारा वीर—जास्त आवडतो आणि म्हणूनच पर्मोपिलीची लढाई, रास्तीस्चोनचा विजय, हल्दीघाटची लढाई, लक्ष्मीबाईची अखेरची लढत, बाजीप्रभूचा पावनखिंडींतील पराक्रम वगैरे प्रसंगांचीं वर्णनें करणें आवडतें.

'वृक्षलता पाषाणांला गोळ्याची आठवती' या ओळींत दर्शित केलेली कल्पना, कवींची, लघुकथालेखकांची व कादंबरीकारांची फार आवडती आहे. शक्य असल्यास तुमच्या वाचनांतील असें एखादें वाक्य सांगा.

३५. जंजिरे विजयदुर्ग ऊर्फ घेरिया. *विजयदुर्ग ऊर्फ घेरिया—*हा इतिहास-प्रसिद्ध पुरातन किल्ला मुंबईच्या दक्षिणेस सुमारें १७० मैल अंतरावर खाडीच्या मुखापाशीं एका खडकावर बांधलेला आहे. याचें पूर्वीचें नाव घेरिया असून, मराठेशाहींतही त्याच नांवानें तो परकीयांना परिचित होता. घेरिया हें नाव गिर्ये गांवावरून पडलेलें आहे. विजयदुर्ग हें शिवकालीन नांव असून या किल्ल्याच्या तीन बाजूला पाणी आहे. समुद्रांतील अशा किल्ल्याला जंजिरा म्हणतात.

शिवलंका = मालवणचा जंजिरा सिंधुदुर्ग. बुरुज = बुरूज. वैजयंती = विजयदुर्गची खाडी. साहेबी = प्रभुत्वाची निदर्शक. वलंदेज = डच. फरासीस = फ्रेंच. हे शब्द मराठी अपभ्रंश आहेत.

कविता काळजीपूर्वक वाचून त्यांतील भौगोलिक व ऐतिहासिक उल्लेखांची विशेष माहिती मिळवा

कमलमीन = (Sea-anemone) समुद्रफूल. हा एक खडकाच्या खोलगट जागीं सांचलेल्या समुद्राच्या पाण्यांत खडकाला झाडाप्रमाणें चिकटून राहणारा प्राणी आहे. याचा आकार कमळासारखा असून, तोंडासभोंवतीं पाकळ्या-सारखे तंतू असतात. त्यांना धक्का लागला तर ते मिटतात. साहित्यपरिचय भाग २, पान ५९ पहा.

कमलमीन, कालवे, खेंकडे याच्या वर्णनानें कवीनें अनुकूल वातावरण उत्पन्न केलें असून सोप्या शब्दांत गडाचें अभिमानपूर्वक वर्णन केलें आहे.

३६. शनवारवाडा. या गझलांतील पहिल्या दोन ओळी यमकांनीं बांधलेल्या असून नतर प्रत्येक युग्मकांतील दुसऱ्या ओळीचा शेवट प्रारंभींच्या ओळीशीं यमकानें जोडलेला आहे.

गझलप्रकाराविषयीं जास्त माहिती प्रो. माधवराव पटवर्धनकृत 'गझलांजली' व 'छंदोरचना' या पुस्तकांत पहा.

के. नारायण काळे—परीक्षण 'फलभार', हा प्रतिभा-पाक्षिकांतील लेख वाचा.

कुरुक्षेत्र, माधवी नीति, हिरीरी, महापूर या शब्दांवर टीपा लिहा.

तृणांच्या पातेवर कवीनें कोणत्या कल्पना रचल्या आहेत ?

'शाहसुनु' हा शब्दप्रयोग छत्रपतीच्या शिक्कामोर्तब करण्याच्या मोहरेवर आढळतो. जुनें वातावरण उभें करण्यासाठीं कवि अशा शब्दांचा उपयोग करतो.

जोतें, चौथरा, पद्मकारंजें हे जळालेल्या शनवारवाड्याचे अवशेष उकरून काढले आहेत.

'विजयनगर, फत्तेपूर, शिक्री, वराईचा किल्ला, विजापूर' व इतर दुसऱ्या ऐतिहासिक स्थळांविषयीं, अशा तऱ्हेचे, किंवा स्फूर्तिदायक विचार दर्शविणारे निबंध वाचा किंवा लिहा.

खालील पुस्तकें व लेख यांवरून तुम्हांला शनवारवाड्याची जास्त माहिती व त्याचें ऐतिहासिक महत्त्व कळेल.

पुणें दरबारीं—कविता-अज्ञातवासी.
सवाई माधवरावाचा मृत्यु—पोवाडा-प्रभाकर, नाटक-खाडिलकर
भाऊबंदकी—नाटक-खाडिलकर.
अखेरेची घेल सुकली—लेख, श्री. म. कोल्हटकर लेखसंग्रह.
तोतयाचें बंड—नाटक-न. चिं. केळकर.

---

## ७ देशभक्ति

महाराष्ट्र-रसवंती, भाग १, पान ८४ वर दिलेलें विवेचन वाचा.

३७. हुतभागिनी. केशवसुत, टिळक, तांबे या कवींप्रमाणें विनायक जनार्दन

करंदीकर ( कवि विनायक ) श्रेष्ठ दर्ज्याच्या कवींत मोडतात त्यांच्या काळच्या इतर कवींप्रमाणें, प्राचीन कवींच्या कवितापद्धतींचें, किंवा विषयाचें अनुकरण किंवा चर्वितचर्वण त्यांनीं केलें नाहीं स्वतऱ्या अन्तःकरणात उसळणाऱ्या भावना किंवा सद्य स्थितीमुळें गतेतिहासाकडे दृष्टि वळवल्यामुळें मनात उत्पन्न होणारे विचार त्यांच्या कवितेंतून दृग्गोचर होतात याच्या कवितेवर इंग्रजी व संस्कृत काव्य-विचाराची छाप सारखीच बसलेली असून, रसिक वृत्ति व राहणी यांचे पुसट परिणाम कवितेवर दिसतात ऐतिहासिक कालाबद्दल विशेषत स्वदेशप्रेम, स्वामिभक्ति, कार्यापुढें आपलीं सुखें कःपदार्थ मानण्याची प्रवृत्ति, यामुळें रजपूत इतिहासाकडे यांचें लक्ष जाऊन त्यांनीं खडकाव्यें व स्फुट कविता लिहिल्या आहेत मराठ्याच्या इतिहासाचीं भरपूर साधनें त्या काळीं उपलब्ध नसल्यामुळें महाराष्ट्राकडे त्याची दृष्टि वळला नाहीं, याबद्दल त्याना दोष देणें युक्त होणार नाहीं कोणत्याहि व्यक्तीची श्रेष्ठता समकालीनाहून ती व्यक्ति किती भिन्न वृत्तीची किंवा पुढारलेली होती यावरून ठरवावयाची असते

कवीची अशी ऐतिहासिक दृष्टि असल्यावर जो देश एकदा वैभवशाली होता त्याला विपन्न स्थिति आलेली पाहून त्याच्या हृदयांत जें कोलाहल उत्पन्न होतें त्याला काव्यमय स्वरूप मिळतें

ह्यात, रूपक या अलङ्काराचा उपयोग सूचक लिखाण लिहिताना फार होतो दशावरील एका हतभागी स्त्रीचें रूपक केलेलें या कवितेंत दिसेल

पहिल्या तान कडव्यात तिची दु स्थिति वणन केला असून पुढील कडव्यातून चिखलात रुतलेल्या गाईसारखी तिची अवस्था झाली आहे असा विषादपूर्ण विचार प्रगट केला आहे

या कवितेंत व तुम्हीं पूर्वीच्या भागात वाचलेल्या देशाभिमानाच्या कवितात तुम्हाला एक सूक्ष्म फरक दिसून येइल गोमतदवी, हिंददेश वगैरे कवितेंतील देशा-भिमान उज्वल व स्पष्ट आहे प्रस्तुत कवितेंत कवीच्या मनातील देशस्थितीविषयीं तळमळ रूपकाखालीं व निराशाजनक विचाराखालीं दडपलेली आहे कवीच्या मनःस्थितीचें व परिस्थितीचें दर्पण या कवितेवरून थोडेंफार समजून येतें

**३८. महाराष्ट्रिका** दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी या कवीच्या कविता विविध प्रकारच्या आहेत संस्कृत पद्धतीच्या काव्याच्या व्यासंगाची छाया

याच्या कवितांवर दिसून येते. यांनीं बऱ्याच ऐतिहासिक कविता लिहिल्या आहेत. गोविंदाग्रजांनीं 'राजहंस माझा निजला' ही कविता लिहून लोकप्रिय केलेल्या वृत्तात यांनीं आपल्या बहुतेक ऐतिहासिक वीरश्री उत्पन्न करणाऱ्या कविता लिहिल्या आहेत. या कविता प्रसंगीं किंचित् लांब व एकाच ठशाच्या वाटतात आणि वर्णनशैली अभिजात काव्यासारखी नसून पोवाड्याची सुसंस्कृत आवृत्ती वाटते. देशाची बदलती स्थिति किंवा बदललेल्या आकांक्षा यांची पूर्ण जाणीव अशा कवींना नसून जुन्या इतिहासांत, त्यावेळच्या कल्पनांत व उपाययोजनांत ते मग्न असतात. उलटपक्षीं यांची श्लोकबद्ध रचना प्राचीन परंपरेस शोभणारी अशी संस्कृतप्रचुर भासते.

ऐतिहासिक कवितेंत रणसंग्रामाचें, एखाद्या वीर पुरुषाचें, किंवा वीर स्त्रीचें गुणवर्णन आढळतें. मराठी इतिहासांत सांपडणाऱ्या स्वाभिमानी, मुत्सद्देगिरी जाणणाऱ्या वीर कन्या, वीर पत्न्या व वीर माता यांची चित्रें एकाच कवितेंत चढून, कवीनें तीं मार्मिकपणें, सूचक रीतीनें मांडिलीं आहेत. गतकाळांतील चित्रें भडक रीतीनें रंगवून, त्यांतील गुण हल्लीं दिसत नाहींत ही आपली कुरकूर त्यानें शेवटच्या श्लोकांत अलंकारिक भाषेंत मांडिली आहे.

## ३७ हतभागिनी

तळहातीं टेकुनी ही स्वशिरातें बैसली ! ॥ ध्रु० ॥
मस्तकीं केश विखुरले,
श्वास चालले, अश्रु लोटले,
गळे जळ गालीं—चिंतेनें पोळली ! १
वस्त्रें तीं अपुरीं जुनीं,
तेथ कोठुनी, असावा मणी,
दीनता त्याली—दुःखानें कावली ! २
दारिद्र्य, घरीं जागतें,
अन्न काय तें, दिसेना कुठें.
वायुजल वाली—गगनाची साउली. ३
होती ही सिंहासनीं,
भाग्यशालिनी, धनी, विजयिनी,
परी तिज खालीं—दुर्दैवें ओढिली. ४

एकाश्रुबिंदुकारणें,
तियेच्या रंगें, झुंमले मनें,
असे सुत व्याली–जयकलीं माउली.
कारटीं कारटीं तियें,
निपजलीं भुतें ! मातृशोणितें-
स्वतांला लाली–आणाया धांवलीं !
कल्याण काय नेणती,
नित्य भांडती, आपसांत तीं
परां वश झालीं–स्वत्वाला विसरलीं !
गेले दिन यावे क्रमें,
वर्तनें असे, एकदां फ्मे–
गाय जी गाळी–चैतन्य ती चालली ! ८

विनायक

## ३८ महाराष्ट्रिका

दास्याची निज–जन्मभूमि-चरणीं आलोकितां शृंखला
दंडाया स्फुरलीं यदीय शरिरें लेशांत उच्छृंखलां
केल्या शौर्यजलें जयीं गिरि-गुहीं ताम्रानना भूमिका
जन्मा देउनियां अशा नरवरां गेल्या महाराष्ट्रिका
“ शाली आजवरा यथेच्छ तनया ! सज्जन्य रक्ताचिया
संग्रामांगणिं बिंदु बिंदु सजणें देशार्थ गाळावया ”
ज्या स्वांकाश्रयि बालकांस वदती मदस्मिता मातृका
देशोद्धारिणि विस्मृतींतुन कशा जाव्या महाराष्ट्रिका !
ज्यांचें शौर्य रणांगणीं बघुनियां स्वर्गीय संतोषती
धर्मांचे मुक्ति बिंदु ना, धरनि ते मोदाश्रु कीं वर्षती
त्यांचा वंशज तूं, मुला ! न मळवीं, रक्षी यशोमालिका !
वीरांच्या उपदेशिका गृहिं गृहिं होण्या महाराष्ट्रिका !
उत्कंठेद्भुसितअधरा कर-वलीं इद्धानना ठेवुनी •
जेव्हां त्या अवतारिणी तिरस्कृत नेणत मातृभूमि

घेवोनी निजहस्तपुष्परचिता माला स्वकांतोत्सुका
होत्या घालित नाथ-कंठिं मधुरा मुग्धा महाराष्ट्रिका
" नाथानें मम, संगरात पुढती केली महागर्जना !
लावोनी ध्वज मस्तरा नग शिरीं तेथें करी घोषणा ! "
वार्तोल्हादिनि चार हास्यवदना स्वामीयशोलापिका
होत्या ना चतुरा सरस्वति इथें धन्या महाराष्ट्रिका !
वृद्धेची सुत-यष्टि भग्न पडता, ' देशार्थ गेली ' म्हणे !
कांतेचें पुसतांहि कुंकुम, ' महाराष्ट्रार्थ गेलें ' ! म्हणे
गंगाभागिरथी समान विमला कल्याण-संवर्धिका
होता सेवित छत्रपाल-नृपती प्रेमें महाराष्ट्रिका
ज्या गंगासलिलावगाह समयीं वद्दानलि प्राङ्मुखी
शीतप्रस्फुरित-स्तनद्वयवत्ता राष्ट्रोदयाच्या सुखीं
स्नातयोत्तम-मंत्रगीत जपती पुण्योत्तमा देवका
ही गोदा रडते परी न दिसती त्या त्या महाराष्ट्रिका
देवाचा पति तो शचीसम महा-साध्वी म्हणोनी रिझे
संगीतहि चित्रसेन ललना-स्वस्तुतीला सज
दोघेहि भजतात मौन वदती वार्ता न पौराणिका
जों आल्या दिसुनी तदीय नयनीं रामा महाराष्ट्रिका
व्योम-स्पृष्ट विशाल शैल शिखरीं सौराज्य-लक्ष्मीसवें
प्रस्थापून विलोकनीय दिधलें ऐश्वर्य त्याला नवें
तन्माता स्मृति या छुतव अचला ! प्रत्यहि होऊन का-
आलिंगून पयोधरास पुसती, कोठें महाराष्ट्रिका ?

तु आ तिवारी

## स्वाध्याय

३७ हतभागिनी या कवितेची चाल एकाकाळीं अत्यंत लोकप्रिय असलेल्या शारदा नाटकांतील पदावरून घेतलेली आहे अर्वाचीन कवि वृत्तात्मक कविता लिहीत त्यावेळीं त्याचे हातून वृत्तदोष क्वचितच होत वृत्तदर्पणा सारख्या ग्रंथांचें अध्ययन हें या विनचूकपणाच मुख्य कारण असे परंतु पदावरून कविता लिहितांना, आठवणीवरून किंवा मनाशीं गुणगुणत कविता

लिहिताना मुव्यवस्थितपणे 'ओव्ही येणें नेहमीं शक्य नसतें. त्यामुळें अनेक नामांकित कवींच्या कवितांतून व पदांतून मात्रादोषांकडे दुर्लक्ष केलेलें दृष्टीस पडतें.

अर्वाचीन कवींच्या कवितांचीं पुस्तकें धरवर चाळलीं तर त्यात मात्रा-वृत्तांचें व पदांचें प्रमाण, गणवृत्तांहून जास्त आढळून येतें अशा स्थितीत मात्रा वृत्तांचें वर्गीकरण व नामकरण करणें व विशिष्ट लक्षणांचें बंधन ठरविणें इष्ट होतें. प्रो. माधव त्र्यंबक पटवर्धन यांनीं आपल्या छंदोरचना या पुस्तकांत हा प्रयत्न केलेला आहे.

वृत्तदोष टाळणें हें कवीस जसें आवश्यक तसेंच वाचकानाहि वृत्तदोष समजणें अवश्य आहे. पदाच्या ओळींतील मात्रांची संख्यारचना मूळ पदाबरोबर किंवा चालीच्या लक्षणाबरोबर ताडून पाहण्याचा अभ्यास ठेवा

'वायुजल वाली गगनाची साउली,' 'एकाश्रु बिंदुवरणें' या ओव्यींतील कल्पना स्पष्ट करा. वाली = रक्षण, पोषण करणारे.

३८. महाराष्ट्रिका. या कवितेंतील समास सोडवून त्यांचे अर्थ करा

महाराष्ट्रिका = मराठी स्त्रिया, हा शब्द प्रत्येक श्लोकाच्या शेवटीं आल्यामुळें नवीन शब्द परिचित वाटून त्या शब्दाचें महत्त्व वाचकाच्या मनावर बिंबतें.

आत्मपय = माझें दूध. प्रत्यब्द = प्रतिवर्षी–पावसाळ्यात. 'पृथ्वेची मुलयष्टि मम पडतां' या श्लोकात वर्णन केलेलें स्वदेशप्रेम प्रत्येक देशाच्या प्रसिद्ध इतिहासात आढळतें. पटवर्धन घराण्यात अशीच एक पेशवेकालीन दंतकथा प्रसिद्ध आहे.

'रडणारी गोदानदी अजून आहे पण त्या स्त्रिया गेल्या' या श्लोकातील विचारांत व भाषेंत संस्कृत काव्यांच्या अध्ययनाचे इष्टानिष्ट परिणाम तुम्हाला दिसतील. आधुनिक कवींत अशीं वर्णनें करणारे कवी क्वचितच आढळतील.

इंद्र व गंधर्व यांनीं मौन कां धरलें असें कवि म्हणतो?

---

# ८ स्फूर्तिदायक कविता

कांहीं कविता वाचून मनाला उत्साह वाटतो व कार्य करण्यास हुरूप येतो. कित्येक वेळां मनाची अशी स्थिति झालेली असते कीं, शुष्क कामधंदा अवघड

वाटूं लागतें. नवीन गोष्ट हातीं घेण्यास हुरूप वाटत नाहीं. सभोंवतीं कच खाणारे लोक असले, पुढें काय होईल याची खात्री नसली तर पुढें पाऊलच पडत नाहीं. अशा वेळीं दुसऱ्याचे स्फूर्तिदायक प्रोत्साहनाचे शब्द ऐकून, मनाला धीर येऊन मनुष्य दुप्पट उत्साहानें कामास लागतो. आपल्यापेक्षांहि प्रतिकूल परिस्थितींत असलेल्या लोकांनीं काय केलें तें ऐकून आत्मविश्वास येतो. खरें श्रेय कशात आहे तें समजल्यावर तात्कालिक संकटांची पर्वा वाटत नाहीं. स्फूर्तिदायक कवितांचा व्यक्तीला व समाजाला अशाप्रकारें फार फायदा होतो. मात्र या कवितांचीं स्वरूपें भिन्न असतात. यांतील कांहीं कवितांतून गतकालाचीं उज्वल चित्रें, भावी कालाविषयीं आशापूर्ण कल्पना, हल्लींच्या लज्जास्पद स्थितीची हेटाळणी व निर्भर्त्सना सांपडते, तर कांहीं कवितांत गंभीर उपदेशकाची भूमिका घेऊन स्मृतिशेष झालेलीं पण त्रिकालाबाधित असलेलीं सत्यें कवि आपणापुढें ठेवीत असतो. रसवंती भाग १ ला, 'प्रांत तुम्हां कां पडे' ही कविता, व भाग २ रा 'क्षात्रधर्म,' केशवसुतांची 'तुतारी' या स्फूर्तिदायक कविता होत.

पुढें दिलेल्या दोन कविता या दृष्टीनें वाचा.

**३९. निराशा शूपच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी.** श्री यशवंत महादेव पाध्ये (कृष्णाग्रज) यांच्या शार्दूलविक्रीडित वृत्तांतील या कवितेंत, प्रसाद व स्पष्टवक्तेपणा आढळतो. कवीची दृष्टि ऐतिहासिक कालांत गुंगली असली तरी त्यांत अंध जात्यभिमान दिसत नसल्यामुळें सुभाषितवजा चौथी ओळ सर्वांना स्वच्छण्यासारखी व पटण्यासारखी आहे. महाराष्ट्र कवींनीं निराशेचीं गाणीं गावयाचें सोडून उत्साहाचीं गाणीं गावीं आणि त्यामुळें लोकांनीं स्फुरित होऊन उद्योगरत व्हावें ही कल्पना खरोखरच मार्मिक व योग्य कालीं केलेली आहे.

**४०. ध्रुवतारका.** ध्येयावर लक्ष ठेवून भोंवतालच्या संकटांनीं डगमगून न जातां, मोहक फसव्या गोष्टींत मन अडकवूं न देतां, लोकांच्या हंसण्याची पर्वा न करतां व दुसऱ्यावर विसंबून न राहतां स्वतः कष्टून मनुष्याला मार्ग काढावा लागतो. ध्येय क्षणभर नजरेआड झालें, तरी विचाराच्या होकायंत्रानें पुन्हां मार्गावर यावें लागतें. एवढेंच नाहीं तर ध्येयापर्यंत मजल गांठतां आली नाहीं तरी प्रयत्नांत समाधान मानून घ्यावें लागतें. ध्येयपूजन हें एक असिधाराव्रत आहे. पण ध्येयाच्या मार्गे लागणें यांत मोठेपणा आहे व जीविताची सफलता आहे. अशा बिकट परिस्थितींत अधीर होणाऱ्या मनाला स्फूर्ति देणारी ही कविता आहे.

इतर सर्व तारे अस्तास पावतात पण ध्रुव अचल रहात असल्यामुळे पुराणांत व सर्व भाषांतील काव्यांत व धर्मांत अचलतेचें, दृढ ध्येयाचें चिन्ह म्हणून तो समजला जातो

## ३९ निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी

शिरीं एकाएकीं कडकडुनि आघात पडले
तुफानानें तारू अवचित समुद्रांत बुडलें
करींचें दुर्दैवें जरिहि तुटलें शस्त्र समरीं
'निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी'

कधीं काळीं मार्गी अपयश न घेवोनि फिरला
मराठ्याचा भाला, जरि न नयना आज दिसला
कृती वन्पूर्वीच्या परिसुनि सुधी पाय उचली
'निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी'

उडी घ्याया जाता क्षणभर तरी कुंठित गती
करायातें लागे सहजचि अशी रीत जगतीं
महाराष्ट्रीयाची स्थिति गमत तैशीच बनली
'निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी'

न ये हातीं विद्या वन-मन-धनां जें न दिधलें
कळीं कैसें यावें मधु कटु किती स्यात भरलें
मनानें तेजस्वी जरि तनु वरी दीन दिसली
'निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी'

रणीं नेणोनीया सहज अरि-कक्षेंत शिरला
हजारों लोकानीं सबळ जरि वेढोनि धरिला
प्रतापें बाहूच्या दिपविन अशी आसचि धरी
'निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी'

निर्धे कापाकापीविण न दुसरें दृष्टिस पडे
उभा मृत्यू खाया मुख पसरुनी नाचत पुढें
रिपे शत्रू शस्त्रें धरनि खुपसाया जरि उरीं
'निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी'

निराशेच्या गानीं कधिं नच महाराष्ट्र दुखवी
मनीं उत्साहाची परि सतत दीप्ति प्रकटवी
ज्याच्या शौर्याचें जन अखिलही कौतुक करी
' रचेना त्या केव्हां दडुनि बसणें घोर तिमिरीं. '

कृष्णाग्रज

## ४० ध्रुवतारका

क्षणि पाउल आतां उचल वरी
स्थिर ध्रुवतारेवर नयन करीं !
वाट भरे जरि कंटकिं सगळी
भुलूं नको दुरि बघुनि हिरवळ
झांकिति पसल्या त्या खोल घ
आण, कोंवळ्या तृणान्तरीं.
दों बाजुस डवरले ताटवे
रंग फुलांचे चंचल नटवे
मोह घालिती गन्ध नवनवे
तिथुनि आवरीं हृदय परी !
चंचल दृश्यीं गुंतव नच मन
रमतगमत पथिं गमवीं काळ न
साध्य न तव हें, केवळ साधन
ध्रुव तव अजुनी दूरवरी.
तन्मयता तव पिसेंच गणुनी
हंसतिल तुज ' वेडा ' म्हणुनि
परि जननिंदा ती अवगणुनी
तूं बेपर्वा चाल तरी !
मिळेल न तुला मार्गी सोवत
टिकेल न पुढें, जरि ती लाभत
बोजा अतुला तरि शिरिं वाहत
सुंच पकडा मार्ग धरीं !

भुग रूपविविल सुरधनु घन व
ज्योत तरी तव उजळी आन्तर
वितळिल जी त्यां निज तेजें स्तर
धुकें विरवि रवि जेवि करी !

लक्ष्य एक तव धरि तीरापरि
—आणि गळाली तनु मार्गी जरि
समाधान हें वाळ्ग अंतरीं
कीं 'तो भारच होई दुरी !"

दा. अ. कारे

## स्वाध्याय

३९. निराशा......कवी. सुधी = शहाणा. या कवितेंत घेतलेल्या दृष्टांताच्या (अभिमन्यू, विश्वासराव वगैरे) मूळ गोष्टी वाचा. ही कविता १९१४ च्या युरोपीय महायुद्धाच्या काळांत लिहिली असल्यामुळे, मराठी वीरांची पराक्रमाची वर्णनें वाचून कवीला मागील काळाची व हल्लींच्या स्थितींतहि दिसणाऱ्या शौर्याची तुलना करावीशी वाटली व मराठे अजूनहि मर्दुमकी गाजवू शकतात ही गोष्ट अभिमानपूर्वक त्याला सांगावीशी वाटली.

महायुद्धांत मराठे लोकांनी भाग घेऊनहि, युरोपियन कवींच्या काव्यांतील पडसादांप्रमाणें, मराठी काव्यात मात्र त्याचे पडसाद उठलेले आढळत नाहींत याचीं कारणें काय ?

४०. ध्रुवतारका. श्री. कारे याच्या 'नदादीप' या कवितासंग्रहातील अशा तऱ्हेच्या दुसऱ्या चिंतनपर व स्फूर्तिदायक कविता वाचा.

इंग्रज कवि वर्डस्वर्थ यांची 'Excelsior' ही कविता वाचून या दोन कवितांतील उद्देशांचें साम्य पहा.

घळ = अरुंद दरी. पिसें = वेड.

जिवाचा बोजा किंवा भार कोणता असें कवीस म्हणावयाचें आहे ?

या कवितेंतील तुम्हांला कोणत्या ओळी आवडतात व त्या कां, तें सांगा.

# ९ सामाजिक कविता

कवीचें मन भावनाप्रधान असल्यामुळें त्याच्या अंतःकरणावर परिस्थितीचें थोडें तरी प्रतिबिंब उमटल्याशिवाय रहात नाहीं. त्याच्या कवितेचे वर्ण्यविषय कधीं पुरातन कालांतले असतात, तर कधीं भावी आयुष्याचीं त्याच्या डोळ्यापुढून सरकणारीं कल्पनाचित्रेंच त्याच्या कवितेंतून रेखाटलीं जात असतात. कधीं स्वतःच्या ध्येयकल्पना वस्तुस्थितींत आहेतच अशी तो कल्पना करतो, तर कधीं दुसऱ्यांच्या हृदयात प्रवेश करून त्यांचीं सुखदुःखें त्यांच्याच मुखानें बोलतो. केव्हां केव्हां स्वतःचे अनुभव आडपडदा न ठेवतां तो मांडतो तर कधीं स्वतःच्या व इतरांच्या अनुभवांचें बेमालुम मिश्रण तो आपल्या कवितांत करतो. तो कधीं चिंतनांत मग्न असतो, तर कधीं सृष्टीच्या लीलांनीं मोहून जातो. त्याच्या काव्यांत गूढ विचारांची इतकी गुंतागुंत होते, कीं तो सभोंवतालच्या जगास विसरला आहे असें दिसतें. कधीं त्याला राष्ट्राची विवंचना पडलेली दिसते, तर कधीं तो उपदेशक बनून प्रवचनें होऊं लागतांना दिसतो. हे सर्व प्रकार तुम्ही आतांपर्यंत अभ्यासलेल्या कवितांत येऊन गेले आहेत.

आतां कवीची निराळी भूमिका पहा. कवि जगाला विसरलेला नाहीं. समाजांतील बऱ्यावाईट गोष्टींची पारख करण्याची पात्रता, निरीक्षणानें, अनुभवानें व विचारानें त्याच्या अंगीं आली आहे. चांगल्या गोष्टीबद्दल ज्याप्रमाणें त्याला अभिमान वाटतो त्याचप्रमाणें दुष्ट रूढींची, अन्यायी नियमांची त्याला चीड येते. गांजलेल्यांची त्याला दया येते. असा कवि वृत्तीनें निर्भीड असल्यास आपल्या जोरदार वाणीनें, काव्यमय भाषेनें तो शब्दांनीं कडक प्रहार करतो. तो हळव्या वृत्तीचा असल्यास दुःखपूर्ण भाषेंत करुणरसानें ओथंबलेलीं हृदयद्रावक दृश्यें रंगवितो. अशा तऱ्हेच्या सर्व कविता सामाजिक कविता या सदरांत घालता येतील. समाजावर टीका करणाऱ्या तुकारामाच्या अभंगांचा नमुना रसवंतीच्या दुसऱ्या भागात तुम्हीं वाचला आहे. केशवसुतांच्या व गोविंदाग्रजांच्या कांहीं कविता, गिरिशांचें 'अभागी कमल,' यशवंत कवीची 'बंदिशाळा,' माधव ज्यूलियनचें 'सुधारक,' हीं खडकाव्यें सामाजिक अन्यायांची किंवा उणीवांची काव्यचित्रें आहेत. या दृष्टीनें पुढें दिलेल्या कविता वाचा.

**४२. दसरा.** गोविंदाग्रज हे आपणास काव्यक्षेत्रांत केशवसुतांचे व नाट्यक्षेत्रांत कोल्हटकरांचे चेले म्हणवीत. त्याप्रमाणें त्यांच्या काव्यांत व नाट-

कांत, दुष्ट रूढीची चीड व सामाजिक दुःस्थितीबद्दल अनुकंपा दिसून येते. विजयादशमी हा दिवस मराठ्यांचें स्वराज्य असतांना फार महत्त्वाचा होता. पावसाळ्याच्या दिवसांत शेती करीत घरीं रहावयाचें व विजयादशमीस सीमोल्लंघन करून मोहिमेवर जावयाचें असा पूर्वीचा प्रघात असे. आतां केवळ तें नाममात्र राहिलें आहे. गांवाच्या शिवेपर्यंत जावयाचें व झाडपाल्याचें सोनें वांटावयाचें ही रूढी झाली आहे. परप्रांतावर हल्ला करून खरें सोनें लुटण्याचे ते दिवस गेले. पूर्वीचा उत्साह मावळला व लोक निष्क्रिय झाले आहेत. अशावेळीं या काळांतलें खरें सीमोल्लंघन कोणतें या विषयींचे या कवितेंतील तडफदार विचार मनन करण्यासारखे आहेत.

त्यांतील भाषा किती जोरदार आहे आणि वृत्त व शब्द मनाला कसे ओघाबरोबर नेतात तें पहा. याच वृत्ताचा उपयोग माधव ज्यूलियन् यांनीं आपल्या 'सुधारक' काव्यांत केला आहे.

'दसरा' या कवितेंत तुतारीचा आवेश आहे पण सरलता नाहीं, असें एक टीकाकार लिहितात. पण तुलना केली तर केशवसुतांची कविता जास्त तडफदार, खऱ्या आवेशाची असून, या कवितेंत जास्त पाल्हाळ आहे असें तुम्हांस दिसेल.

४२. संक्रांत. सौ. मनोरमाबाई रानडे ( १८९४-१९२६ ), यांच्या कांहीं कविता अभिनव-काव्यमाला भाग ३ व ४, यांत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या रविकिरणमंडळाच्या सभासद असल्यामुळें, किरण, उषा, दलाश व प्रभा या पुस्तकांतहि त्यांच्या कविता आढळतील. स्त्रियांचीं काव्यें यावर त्यांनीं 'काव्यविचार' या पुस्तकांत एक मार्मिक निबंध लिहिला आहे. या मुंबई विश्वविद्यालयाच्या पदवीधर असल्यामुळें संस्कृत काव्याचा त्यांचा झालेला अभ्यास आणि रेंदाळकर प्रभृति तत्कालीन कवींच्या काव्यपद्धतीचें प्रतिबिंब त्यांच्या संस्कृतप्रचुर भाषेंत दिसून येतें. विचारांची नवीन दृष्टि व भावनाप्रधान कल्पना त्यांच्या इतर कवितांत दिसून येतात. त्यांचीं प्रेमगीतें उत्कट, तरल भावनांनीं भरलेलीं आहेत. संक्रांत या कवितेंत 'तिळगूळ घ्या गोड बोला' या वचनांतला पोलपणा व जीर्णरूढींतील दांभिकता यांचा सौम्य शब्दांत निषेध केलेला आढळेल. दक्षिणायन संपून उत्तरायण लागतें; थंडीचे दिवस संपून वसंतास खरी सुरवात होते ती मकरसंक्रांतीपासून.* हा दिवस मागें येत येत आतां २२ डिसेंबरला खरी संक्रांत येते. हा खगोलीय गोष्टीचा कवयित्रीनें आपल्या कवितेंत कुशलतेनें उपयोग करून घेतला आहे.

**कोणाचें तरि पोर हें!** पहिल्या दहा ओळींत कवीनें शब्दचित्र रेखाटून स्वतःचे विचार प्रदर्शित केले आहेत. या धुनीतांत विचारांची कलाटणी दहा ओळींनंतरच मिळते, त्यामुळें ठराविक पद्धति येथें आढळून येत नाहीं. शेवटच्या दोन ओळींत मातृप्रेमाची महती वर्णन केली आहे. अमंगळ, कुरूप 'स्वतोक पितरां रुचे' असें मोरोपंत म्हणतात. तशा अर्थाच्या म्हणीहि आहेत. या कवितेच्या मागें दुसराहि एक गर्भितार्थ आहे. गरिबीमुळें, अज्ञानामुळें अनेक मुलांची आबाळ होते. इतर जातीसंबंधीं उच्चवर्णीयांचे विचार बहुधा या तऱ्हेचे असतात. हृदयाच्या मोठेपणामुळें, नैसर्गिक प्रेमामुळें असे भेदाभेद करण्याचें कांहीं कारण नाहीं; असाहि कवीचा आशय दिसतो.

**४४. जगरहाटी.** यशवंत कवीच्या या कवितेंत आवेश, निर्भीड स्पष्टवक्तेपणा व उद्वेग यांचा कळस झाला आहे.

जगाची तऱ्हाच अशी आहे, कीं व्यक्तीला जिवंतपणीं त्रास द्यावयाचा किंवा त्याची उपेक्षा करावयाची आणि मेल्यावर स्तुति करावयाची किंवा हळहळावयाचें. 'मेल्या म्हशीला मणभर दूध' ही म्हण प्रख्यात आहे. यशवंत कवि एका कवितेंत टीकाकारांना उद्देशून म्हणतात, कीं 'आम्हीं मेल्यावर तुम्ही दगडी पुतळे उभाराल पण जिवंतपणीं त्रास द्याल.'

जन्मभर ज्याला जगानें त्रास दिला असा जीव मेल्यावर आपल्या स्मशानयात्रेबरोबर जात असतां त्याच्या मनांत (?) जे विचार येतील ते त्यांनीं या कवितेंत मांडले आहेत. तुम्हांला जें कांहीं चांगलें म्हणावयाचें असेल, जें सुख द्यावयाचें असेल तें मनुष्याला जिवंतपणीं द्या, असें सांगण्याचा कवीचा आशय आहे.

कवितेचा विषय जुना असला तरी त्यांतील मनस्ताप व विषाद अत्यंत प्रखर रीतीनें नवीन मांडणींत प्रकट झाला आहे.

## ४१ दसरा

(रूढीचें सीमोल्लंघन हाच समाजाचा दसरा)

चला आज हा आला दसरा ?
पाऊल पुढतें टाकायाला,
सीमोल्लंघन करावयाला,

सणांमधें सण हाच खरा!
चौमासाला आतां विसरा
मुसळधार तो पाउस वरला,
तुडवित पायांखालीं चिखलां
शेत पेरिलें येत पिकाला,
येतो आनंदाचा दसरा!
पहिल्या दुमत्या गाई विसरा!
उन्हाळ्यांत त्या उडाल्याच ना?
त्या गाईंच्या सिहारांना
नव्या दमानें सोडा राना,
चला खाउं द्या पहांटचारा!
करा जरासा मुखडा हंसरा!
आतां कां हीं तोंडें रडवीं?
कडवीं बीजें करी गोडवीं,
फुटलें तुटलें पुन्हांहि जडवी,
आला ना तो तुमचा दसरा?
चला रूढिवर आतां घसरा!
टाकुनि सीमा मृत धर्मांच्या,
दंभाच्या या अंधपणाच्या,
जुनेपणाच्या अहंपणाच्या,
सीमोल्लंघनकाळचि दसरा!
जुन्या मतांचा आला कचरा!
नव्या मताचे जे राऊत,
खरेखुरे मायेचे पूत,
येऊं द्या धैर्याला ऊत
नका हातचा दवडूं दसरा!
नका हातचा दवडू दसरा!
जुन्या ऋषींना सलाम ठोकुनि
करा तयारी छाती ठोकुनि
*आजकालच्या ऋषींमागुनी*

जा तिकडे नेइल हा दसरा ! — ॥
श्रुतिस्मृतींना आतां विसरा !
अंधभक्तिचा पांगुळगाडा
मोडुनि तोडुनि उपडा पाडा !
पाताळीं तो नेउनि गाडा !
करा साजरा यापरि दसरा !
नेट धरा धीराचा जबरा !
खुल्या मनाचा अबलख घोडा
जीन नको उफ्लाणीं सोडा !
जेरबंद या लगाम तोडा !
सीमोल्लंघनकालच दसरा !
जुन्यापुराण्या विध्या विसरा !
जरिपटका घ्या सुधारणेचा !
भगवा झेंडा नव्या मताचा !
नव्या दमानें फडकविण्याचा
मानवधर्माचा हा दसरा ?
नव आशेच्या तृणांकुरांचा ?
तुरा शिरावर, चढवा साज,
मढवा न्यायाचे शिरताज,
समचित्ताचे बरकंदाज
चला जमूं द्या जमाव तुमचा.
काळाचें मैदान अफाट,
दिसतां कोठें खंदक खांचा
द्या घोड्याला अमीन टांचा
वाऱ्यावरच्या करवा माचा
धरा रस्ता अटोकाट !
चला निघूं द्या असली स्वारी,
जुनाट पोकळ नगारखाना
वेड्यावरला कुणी शहाणा
वाजवितो त्या आधीं हाणा !

घ्या कृष्णाची करीं " तुतारी "
रूढीच्या किल्ल्यावर स्वारी.

" आगरकरां " ची झडवा नौबत !
" भागवतां " ची धराच हिंमत !
" केशवचंद्रां " चें घ्या पिलखत !
फुंका " कृष्णाची " च " तुतारी.

रूढीचा गड खालीं उतरा,
पाकोळ्या घुबडांना उडवा,
जिवंत सोनें अखंड लुटवा,
कृपण मनाचा रस्ता खुटवा,
असा साजरा कराच दसरा !

कमठे पूर्वज घेउनि बसलां ?
होते मोठे सोन्यां भरले
त्यांचें आतां काय राहिलें !
त्यांचें त्यांच्या मागुनि गेलें.
शिक्का कायमचा तो कसला !

उगाच घ्याउनि बसतां हाय !.
पूर्वज आले चार पावलं, '
एकमारग्ने पुढें सरकले,
म्हणुनिच ना ते इनके आले ?
त्यांना पूर्वज नव्हते काय ?

कुंभारामारगेच छोटे
मोटें दर्ते तस्व आज तें,
पूर्वज मंजत पुढें चाकले
धावपून ही नमती धरिते
बडे यासके मुर्दी धेटे !
रहत पैमले महारमांग
दौनपगाळ गर्वे छळलें, – –

अज्ञानाला भिउनी पळतें,
त्या वर घ्याया नच तें वळतें
उचलवा त्या लावा आग !

थांबा, ऐका देउनि कान
सुकल्या हातीं बाला कोमल,
तशाच विधवा करिती तळमळ
फत्तर फुटतिल येउन कळवळ
कुठला पोकळ गताभिमान ?

चला उठारे बाधा कवर !
तुमच्यापुरती ही धीशक्र
टाकुनि, रूढीशीं द्या टक्कर !
युद्ध मानवा रे घनचक्कर !
फोडा कुजकें हें अवडबर !

गेल्या हें धर्माचें भूत
पाहुनि बसला का रे भीत ?
नव्या मताचे भालाईत
घोडे अपुले या उडवीत
नातरि रडते व्हा राऊत !

अनतकाळाचे मैदान
हिम्मतवाले यातुकस्वार,
उत्साहाची करिं तलवार,
चित्साक्षीची ढाल तयार,
घोडा फिरवा रानोरान !

सरता काळाचें मैदान
घोडा उडवा मरा आकाशीं
भिडवा नेउनि स्वर्गापाशीं
पर्णवणारीं इरापन्नरीं,
तरीच होईल दसरा स्नान !

कुणी मनाचा असेल कचा
करील त्यालाही मनशूर
या गाण्यांचे गाउनि सूर
"केशवपुत्रा" चा मझ्दूर
"गोविंदाग्रज" चेला सचा!

गोविंदाग्रज

## ४२ संक्रांत

वर मधुर स्वरांची गोड पुटें चढवावीं,
नव वस्त्र लेउनी हास्यमुखें अर्पावीं,
परि दुसऱ्या दिनिं जन मार्गे आक्रमी पहिला,
धान्यर्थ असो! परि अर्थ न आतां उरला!
शर्करा खूप पेरावी वरिवरी,
निर्जवैररूप दडवावें अंतरीं,
ही लटकी नटवी प्रीती जगभरी,
रसनेस वोचती शल्यें व्याजोक्तीचीं,
कुचकामी चंचल संक्रांत असे नित्याची.
क्षण मान मुरडुनी पाहिल जिकडे धरणी
हिमखड वितळुनी दृश्य खुले कुसुमांनीं,
ऋतु शिशिर संपुनी वसंत मधु नांदेल,
परि वैर आमुची पाठ कधिं न सोडील
संक्रांत रूप सृष्टीचें बदलिते,
प्रतिवत्सर पुनरपि दानी कृत्य तें,
स्थित्यंतर चिरकालाचें कुठुनि तें,
परि तेंहि असूं दे! आपण सृष्टीमागें!
हें ढोंग पुरे! व्हा अज्ञानांतुनि जागे!
जगिं अज्ञानाची रात्र कमी होवोनी
रवि शिक्षणकर—संजीवन दे सिंचोनी.
निःस्वार्थ मातृकर सुनीतिशिक्षापटलें
शिशुमनात चढवी, ( ध्येयाचीं वर शाल

देईल स्फुरण हा हलवा उद्यमीं
स्फुरवील बाहु वीराचे रक्षणीं,
भूषवील पूर्वज सारे भूषणीं,
ये पुरपा पौरुष, स्त्रीत्व खरें महिलांत..
त्या दिवशीं भारत सजीव, ती संक्रांत !

सौ. मनोरमाबाई रानडे

## ४३ कोणाचें तरि पोर हें ?

" कोणाचें तरि पोर हें ? दिसत हें आहे किती धामट !
त्याचें तें ध्यवलें !—इथें किळस हो, त्याची मला वाटत !
हा हा, या झिपऱ्या भिकार उडती निर्बंध डोईवरी,
त्यांना तेलफणी कधीं लव तरी माहीत जन्मांतरीं ?
हीं बोटें चघळीत काय बसलें !—रे राम रे—लाळ ही ! ! "
काळीं काय गळ्यांतुनी जळमटें आहेत पन्नास हीं !
शी शी ! तोंड अती अमंगळ असें आधीच हें शेंबडें—
आणी काजळ ओघळे वरुनि हें ! त्यांतूनही हें रडें ! !
तो जो कोण " मुलें फुलेंच " म्हणतो, ओंकारवाणीं हवीं—
त्याला दाखविण्या अशीं तरि मुलें ! आईच मीही कवी ! ! "
तों ये धांउनि तेथ उत्सुक अशी बाई कुणी सत्वर
"' माझं बाळ ग सोनुलं " म्हणत घे त्याचे मुके शंभर !
प्रेमाश्रुस्मितहर्षयुक्तहृदयें आहेत आम्हांस हीं—
आई ! पोटिं तुझ्या अगाध परि जी माया, न ती स्वर्गिही !

रामचंद्र अनंत काळेले

## ४४ जगरहाटी

जगा ! तुझी सारी तऱ्हा सदा उफराटी ।
एक तरी बागेंतील
फूल कौतुकें-देशील
बाळीगेली आशा फोल

अशा घुमराशीमाजी सुटे मात्र ताटी !
आपुल्याच जातां पायीं
पाहियलें ठायीं ठायीं
केव्हढी ही आतां घाई
चालविती घाया खांदा, मिरविती हातीं !
पुरूषाचा शब्द गोड
बोलला न कोणी भड
उठविली निन्दा-कोड
स्मशान हें निनादतें अशा स्तुतिपाठीं !
साद कुठें येईल का
हाय अपेक्षेनें एका
तुडविलें तिन्ही लोकां
मिळ्य कलेवरा धाया अतां आसदाटी !
ह्यावीण आगडोंब
विझविण्या एक थेंब
मिळाला न, आतां कुंभ
किती रिकामे हे होती तिलांजलीसाठीं !
उभविला स्नेहगाथा
पाचोळाच आला हाता
खिरेटोक झाली माया
अस्थिवरी देवालयें अशा नदीकाठीं !
मिळावया अन्न कोठें
झिजविलीं उंबरठे
बंद दार जेथें तेथें
धूपारती शेजारती अशा दिनराती !
सजवून पावजीव
ओवाळतां आतां शीव
दाखविती प्रेमभाव
परिमार्जनाची धन्य तुझी ही रहाटी.

## स्वाध्याय

४१. दसरा. केशवसुताची तुतारी ही कविता वाचा. पादाकुलकाच्या पांच पंक्ति घेऊन, आद्य व अन्त्यपंक्तींचें एक यमक व मधील तीन पंक्तींचें एक यमक साधून केशवसुतांनीं 'तुतारी' कविता लिहिली. तेंच वृत्त या कवितेंत योजिलें आहे. दसरा व सीमोल्लंघन यांवरील इतर कविता वाचा.

उपरणी–ज्यावर खोगीर नाहीं असा. ही कविता रुढी मोडून सुधारणेचा पुरस्कार करणारी आहे असें दाखविणाऱ्या ओळी निवडून वाचा. आगरकर, भागवत व केशवचंद्रसेन या सुधारकाग्रणींचीं चरित्रें शिक्षकांकडून समजावून घ्या. रा. ग. हर्षे—गोविंदाग्रज (काव्य-परिक्षणात्मक निबंध) पृ० ७७ यात आलेली या कवितेवरील टीका वाचा.

या कवितांतील जुने मराठी शब्द निवडून त्यांचे अर्थ करा.

४२. संक्रांत. या सणाविषयींच्या इतर कविता शिक्षकास विचारून वाचा. कांहीं कवितात हलव्यावर किंवा तिळगुळावर रूपकें आहेत व कांहीं आध्यात्मिक आहेत.

शास्त्रीय ज्ञानाचा वाङ्मयांत रूपक, दृष्टान्त वगैरे ठिकाणीं प्राचीन व अर्वाचीन कवींनीं उपयोग करून घेतला आहे या दृष्टीनें कविता वाचण्याचा अभ्यास ठेवा.

४३. कोणाचें तरि पोर हें? कवि टिळक यांची 'सारीं फुलेंच फुलें' ही कविता वाचा. मातेप्रमाणें ज्या सतकवींनीं प्रेमळपणानें मुलाविषयीं आपलेपणा दाखविला त्यांच्या गोष्टी वाचा. सामाजिक सुधारणेस पुष्टि देईल असा या कवितेच्या संविधानकांत बदल सुचवा. ही कविता साभिनय म्हणून पहा.

संस्कृत काव्यशास्त्राच्या मतें या कवितेंत बीभत्स व वात्सल्यरसाचें मिश्रण आहे.

४४. जगरहाटी. या कवितेंतील प्रत्येक कडव्यांत पूर्वीची स्थिति रूपकानें व्यक्त केली आहे. तीं रूपकें कोणत्या स्थितीचीं आहेत तें पहा. उदाहरणार्थ, बाग, साद, आगटेंच, क्लिष्टेक वगैरे.

# १० विकारदर्शन

या विभागांतील कविता एका विशिष्ट हेतूनें एकत्र केल्या आहेत. या कविता वाचा आणि त्याचा मनावर काय परिणाम होतो तें पहा. कोणतेंहि गहन तत्त्व, गूढ संशोधन कवीस करावयाचें नाहीं. बाह्यसृष्टीचें किंवा व्यक्तीचें चित्र रेखाटावयाचें नाहीं. एकादा आयुष्यांतला प्रसंग, किंवा मनःस्थिति, अथवा समाजांत प्रत्यहीं आढळणारी घटना घेऊन कवि स्वतःच्या मनांत उचंबळणाऱ्या भावना व्यक्त करतो, क्वचित् प्रसंगीं, सामान्य जनास सहजासहजीं न कळणाऱ्या गुंतागुंतीच्या भावना व त्यांचे इतर व्यक्तींवर होणारे परिणाम कुशलतेनें मांडणें एवढेंच ध्येय कवीपुढें असतें. विचारापेक्षां विकाराचें प्राधान्य अशा कवितेंत दिसतें. मग त्या वर्णनात्मक असोत किंवा संभाषणात्मक असोत किंवा केवळ स्वतःशींच गुणगुणलेल्या असोत. या दृष्टीनें पुढील कविता वाचा.

४५. माझी कन्या. कवितेच्या प्रारंभींच कवीनें गोष्टीचा प्रसंग सांगितला आहे. पहिली दिंडी वाचतानाच साधी घरगुती व प्रासादिक भाषा मनावर मोहिनी घालते. या कवितेंत कोणतींहि गूढतत्त्वें किंवा कोणत्याहि गहन भावना सांगावयाच्या नसल्यामुळें वाचतां वाचतां अर्थ कळून वाचक ओघांत वहात जातो, गरीब बाप मुलीची समजूत घालतो, पण त्याच्या हृदयास कसे घरे पडले आहेत तें आपल्या तावडतोब लक्षांत येतें. कविता लांब असली तरी तिचा कंटाळा येत नाहीं. 'खरें सारें पण मूळ महामाया' या पुढील २० ओळींत वर्णिलेला आध्यात्म विषय मुलीच्या बुद्धीस कळण्याजोगा नसला तरी कवीची आध्यात्मिक प्रवृत्ति दाखवितो.

या कवितेंतील ओळीओळींत वाक्प्रचार, म्हणी व रम्य कल्पना तुम्हांला आढळून येतील. जगाला कंटाळलेल्या पित्यानें, मृत्यूची गोष्ट काढतांच देवाच्या दूरच्या गांवीं जातों असें म्हणणें जितकें स्वाभाविक, तितकेंच रडें विसरून गावास जाण्याच्या आनंदानें मुलीनें मीहि येतें हें म्हणणें किती स्वाभाविक आहे! बापलेकीच्या मनातील विचार कवीनें किती काव्यमय रसाळवाणीनें मांडले आहेत!

४६. मी तुझी मावशी तुला न्यायाया आलें! श्री. लक्ष्मीबाई टिळक या कवि टिळक यांच्या पत्नी. यांच्या कविता थोड्याच पण उच्च दर्जाच्या आहेत. या गीतांत मावशीच्या मुखांतून वर्णिलेली स्थिति महाराष्ट्रांत खेडोखेडीं आढळून

येते दिवाळीच्या दिवसांत भाऊबीजेसाठीं माहेरीं जाण्याचीं मनोराज्यें करीत एक मुलगी पाणवठ्यावर घागर घेऊन उभी आहे आपल्याला कोणी. तरी नेण्यास आलें असें तिला क्षणोक्षणीं वाटतें आणि ती निराश होते बाल-विवाहाच्या रूढीमुळें खेळण्याच्या वयांत ससारांत पडलेल्या या अल्लड मुलीचा ओढा माहेराकडेच असणार यात काय नवल ? आणि अशा वेळीं ही मनकवडी प्रेमळ भावशी 'तिला न्यावयाला आली आहे. उघड उपदेश न करतां बालविवाहाच्या चालीवर लक्ष्मीबाई टिळकांनीं सौम्य शब्दात जी मार्मिक टीका केली आहे तिचा परिणाम अनेक उपदेशपर निबंधानीं किंवा व्याख्यानानीं होणार नाहीं पहिल्या कडव्यांत शरीराचे व दुसऱ्यात मनाचे व्यापार वेंचक शब्दांत मांडले आहेत

**८७ अर्थोहि कन्या परकीय एच.** कालिदासाच्या शाकुंतल नाटकांत कण्व मुनीच्या मुखातून हें सुभाषित निघालें असून, मुलीच्या विवाहप्रसगीं प्रत्येक पित्याच्या मनांत तसेंच बाहेर उत्पन्न होऊन डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूच्या मिषानें हें सुभाषित बहात असतें माधव ज्यूलियन याची ही कविता, अत्यत हृदयस्पर्शी नाट्यगीत (भूमिका-गीत ) आहे या कवितेचा प्रसग नीट लक्षांत घ्या आणि शांत वेळीं ही कविता वाचून पहा तुमचेंहि हृदय भरून आल्याशिवाय राहणार नाहीं सकाळीं मांडवांत मुहूर्तावर विवाहविधि झाला, जेवणावळी झडल्या, व्याही जेवून गेले. मांडवात व घरात जिकडे तिकडे शांतता झाली रात्र पडली आहे मुलें, पाहुणे माडवांत विश्रांति घेत आहेत, मध्यरात्रीं वराकडील मंडळी वरातीकरिता येणार आणि नवीन मिळालेला हक्क बजावण्यासाठींच जणू काय, थाटामाटानें आपल्या मुलीला, लहानपणापासून खस्ता खाऊन, वाढविलेल्या पोटच्या गोळ्याला सासरीं घेऊन जाणार, या दु खद विचारांत चूर होऊन बिचारा पिता खोलींत एकटा लोडावर मान टेकून पडला आहे माहेर सोडून जातांना होणारें दु ख, व पुढील ससाराची सुखमय भावी कल्पना या द्वंद्वांत गोंधळलेली नवरी मुलगी त्याच्या जवळ येऊन डबडबलेल्या डोळ्यानीं त्याचें समाधान करू पहात आहे हा हृदयविदारक प्रसंग दिवसभर उपास केलेल्या पित्याम दुधाचा आग्रह करणारी मायाळू लेक ! शहाणा, अनुभवी, विवेकी बाप या प्रसंगीं काय बोलणार ? त्याच्या हृदयांतल्या सर्व वेदना शब्दांत कशा उतरणार ? आतां त्याचे शब्द वाचा, शोक आवरून त्यानें केलेला उपदेश आणि कवितेचा शेवट पहा किती उत्कृष्ट आहे कविता ! आतां कवीचें कौशल्य पहा हें सर्व वातावरण कवीनें कोणते शब्द व कोणत्या कल्पना योजून केलें तें पहा

४८ सुमनांजलि. हें गीतिका वृत्तातील सुनीत आहे पहिल्या दहा ओळींत चांदण्या रात्रीचें वर्णन आहे, चंद्रासारखा मित्र व प्रियनामाचा जप हीं साधनें जवळ असल्यावर स्त्रीजातीस स्वाभाविक वाटणारी भीति मन झुगारून देतें वियोगामुळें नेत्रांत येणाऱ्या अश्रूंचाच हार गुंफांत आपण आपला काळ कंठावा असें कवयित्रीस वाटतें या कवितेंतील शब्दांचा ओघ, संस्कृत पण समजण्यास सोपे व नादमधुर शब्द यावरून कवयित्रीचें संस्कृत भाषेवरील प्रभुत्व दिसून येतें या कवयित्रीनें स्वत च्या प्रेमविषयक कल्पना व अनुभव स्वत च्या कवितेंत वर्णिलेल्या आहेत लक्ष्मीबाई टिळक व मनोरमाबाई रानडे यांच्या कवितांतील हा विशेष इतर कवयित्रींत इतक्या उत्कटपणें सांपडत नाहीं

## ४५ माझी कन्या

[ शाळेंतील एका मुलीला कोणी भिकारीण म्हटल्यावरून, घरीं येऊन ती स्फुदून स्फुदून रडत आहे आणि बाप तिची समजूत करीत आहे, असा प्रसंग कल्पिला आहे विषादाचे तळावर बापाचा विनोद मुख्यत वर्णन करण्याचा या कवितेंत यत्न केला आहे ]

गाइ पाण्यावर काय म्हणुनि आल्या ?
का ग गंगायमुनाहि या मिळाल्या ?
उभय पितराच्या चित्त-चोरटीला
कोण माझ्या बोललें गोरटीला ?
उष्ण वारे वाहती नासिकांत,
गुलाबाला सुकविती काश्मिरांत,
नंदनातिल हलविती बल्लरीला,
कोण माझ्या बोललें छबेलीला ?
शुभ्र नक्षत्रें चंद्र चांदण्याची
दृढ रचलेली चिमुकली मण्यांची
गडे ! भूईवर पडे गडगडून,
का ग आला उत्पात हा घडून ?
विभा विमला आपटे प्रधानांच्या
अन्य कन्या श्रीमान कुलीनांच्या

गौर चैत्रींची तशा सजुनि येती,
रेशमाचीं पोलकीं छिटें लेती.
तुला "लंकेच्या पार्वती" समान
पाहुनीयां, होवोनि साभिमान
काय त्यांतिल बोलली एक कोण
"अहा!–आली ही पद्म-भिकारीण!"
मुली असती शाळेंतल्या चटोर,
एकमेकींला बोलती कठोर,
काय बाई! चित्तांत धरायाचें
शहाण्यानें ते शब्द वेडप्यांचे?
रत्न सोनें मातींत जन्म घेतें,
राजराजेश्वर निज शिरीं धरी तें,
कमळ होतें पंकांत, तरी येते
वसंतःश्री सत्कार करायातें.
पंकसंपर्कें कमळ का भिकारी?
धूलिसंगें तें रत्न का भिकारी?
सूत्रसंगें सुमहार का भिकारी?
कशी तूंही मग मजमुळें भिकारी
बालसरिता विधु वल्लरी समान
नशीबाची चढतीच तव कमान;
नारिरत्नें नरवीर असामान्य
याच येतो उदयास मुलांतून.
भेट गंगायमुनांस होय जेथें,
सरस्वतिही असणार सहज तेथें,
रूप सद्गुण संगमीं तुझ्या तैसें,
भाग्य निश्चित असणार तें अपैसें.
मेघगोष्टांतुन बालकिरण येती,
नाच तेजाचा तव मुखीं करीती;
पाच माणिक आगसी हिरा मोती

गडे ! नेत्रां तव लव न सुखीं येती.
लाट उसळोनी जळीं खळें व्हावें,
त्यांत चंद्राचें चांदणें पडावें,
तसें गालीं हांसतां तुझ्या व्हावें,
उचंबळुनी लावण्य वर वहावें !
गौर कृष्णादिक वर्ण आणि त्यांच्या
छटा पातळ कोंवळ्या समन्वयांच्या
सर्व घेउनि तनुवरी अद्‌भुतांचा
खेळ घाले प्रभु रंगदेवतेचा !
काय येथें भूषणें भूषवावें,
विविध वसनें या अधिक शोभवावें ?
दानसीमा ही जेथ निसर्गाची,
काय महती त्या स्थळीं कृत्रिमाची !
खरें सारें ! पण मूळ महामाया
आदिपुरुषाची कामरूप जाया
पहा नवलाई तिच्या आवडीची
सृष्टि शृंगारें नित्य नटायाची.
त्याच हौसेंतुन जगद्रूप लेणें
प्राप्त झालें जीवांस थोर पुण्यें,
विश्वभूषण सौंदर्य-लालसा ही
असे मूळांतचि, आज नवी नाहीं !
नारि मायेचें रूप हें प्रसिद्ध,
सोस लेण्यांचा त्यांस जन्मसिद्ध,
तोच बीजांकुर धरी तुझा हेतु,
विलासाची होशील मोगरी तूं !
तपःसिद्धीचा 'समय' तपस्व्याचा,
'भोग' भाग्याचा कुणा समाप्याचा,
पुण्यवंताचा 'स्वर्ग' कीं, कुणाचा,
'मुकुट' कीर्तीचा कुण्या गुणिजनाचा

"यश.श्री" या ही खुणा महात्म्याची,
"धार" कोण्या रणधीर कट्यारीची,
दिवसमासें घडवीतसे विधाता
मुखा पाहुन वाटतें असें चित्ता!
मुला घेउनि पोलकें मलमलीचें,
कुडी मोत्यांचीं, फूल सुवर्णाचें,
हौस बाई! पुरवीन खुशी सारी,
परी आवरिं हा प्रलय महाभारी!
दों मळकट झांकोनि चंद्रिकेला,
तिच्या केलें उद्विग्न चांदण्याला;
हास्यलहरींनीं फोडुनी कपाट
प्रकाशाचे वाहवीं शुद्ध पाट!
प्राण ज्यांचेवर गुंतले सदाचे,
कोड किंचित् पुरवितां न ये त्यांचें,
तदा बापाचें हृदय कसें होतें,
न ये वदतां, अनुभवी जाणती तें!
आज धनिकाचा पडे फिका साचा,
असा माझा अभिमान गरीबाचा
प्राप्त होतो परि हे असे प्रसंग
हृदय होतें हदरोनियां दुभंग!
देव देतो सद्गुणी बालकांना
काय म्हणुनी आम्हांस करंट्यांना?
दोष त्याच्या ग्रंथास लाउनीयां
गूढ घेतों हें त्यास पुसोनीयां!
"गांठिं जातों," ऐकतां त्याच कानीं
पार बदलुनि ती बालमूर्ति गेली!
गळ्यां घालुनि ती करपाश रेशमाचा
वदे "येतें मी" बोल मधुरवाचा!

## ४३ मी तुझी मावशी तुला न्यावया आलें !



ही भरली घागर तुझ्या शिरावर बाळे !
तूं उभी; टाकले कुठें कुठें तव डोळे ?

ही गाडी याजे खडखड खडखड दूर,
हें इकडे उडतें धडधड तवही ऊर !
तूं प्रसन्न आतां, क्षणें खिन्न तूं होशी
मेघांत गवसला चंद्रच दुसरा दिसशी !
तूं अल्लड, साधी पोर ! लाडके,
गुरुजनें कल्पिली थोर लाडके,
तुज कशास हा संसार ! लाडके,
हा दोन दिवस तरी टळो, म्हणोनी झालें—
मन अधीर, गेलें माहेरा तय गेलें !
माहेरीं आपण भाऊबिजेला जाऊं,
येतील न्यावया बाबा अथवा भाऊ,
हें प्रौढपणाचें ओझें फेंकुनि देऊं !
सुधतील येवढे खेळ खेळुनी घेऊं !
ही मनांत तुझिया बाई वासना,
मीं ओळखिलें कीं नाहीं ? सांग ना !
भर पपुं पुन्हां अश्रुंहीं ! लोचनां
ये हांसत आतां आलिंगी मज बाळे !
मी तुझी मावशी तुज न्यावया आलें !

लक्ष्मीबाई टिळक

## ४७ अर्थोहि कन्या परकीय एव

( गझल )

दान मी केलें जरी मोठा करती सोहळा !
तुज पुत्राच्या ठिकाणीं मानिलें मोहून मी
कष्टलें कीं या जगीं लागेल ना तूलं झळा.
सासरीं तुझ्या भर्ता मी वासलें चोरापरी-
सांगती कांहीं तरी लाडांत कीं "तेथें चला"
तूं स्मृती भर्त्यातिची-आतां न तूं माझी अशी
जागच्या जागींच मी चिंतित तुझ्या वेगळा.
चाल जा ! निष्काम सेवा सासरीं सौख्यें करी
कां न मातेची अशा कन्येस ती साधे कला ?
अश्रु कां नेत्रीं तुझ्या सौभाग्यसाम्राज्ञी मुली !
देख भावी स्वर्ग-माझा तोड, जाऊं दे लळा !
स्पर्शलीं स्वर्गं तो अश्रूंतुनी भासे जसा
तो गिरी वृष्टींतुनी सौवर्ण तेजानें भला.
पूस डोळे, हास बेटा ! आणि जातांना असा
चुंबनानें गोड संपो वास तुझा पथला.
ऐक ! जा ! हाकारितें त्या मंडपीं कोणी तुला
राहणें आतास्मशानीं मागुतें मी एकला.

माधव ज्यूलियन्

## ४८ सुमनावलि

( सुनीत; वृत्त-गीतिका. )

मधुरस्मिता मृदुशीतला विधुची प्रभा बघ फांकली
सुखशान्तिदायक शुभ्रता उधळोनियां क्षितिमण्डलीं !
मृदु वायुच्या झुळकीसवें तरुवल्ली हलु डोलतां
हिमशुभ्र पाडुनि चन्द्रिका गुजगोष्टि तीं करुं लागलीं !
कुसुमें सुवासिक नाजुकी जनमानसामधि वेधिनी
सुमवाटिका रसिकांप्रती विसवीत तत्पर राहिली !
अतिमन्द वीचि जलाशयीं पवनासवें मृदु कांपती
कमलावरी अलिगुंजनस्वनना प्रदीपिंच लोपली !

पसरे अलौकिक स्तब्धता जणुं मानवी अवनी लपे
प्रकृती परात्पर देवता अधिकार चालवुं लागली !
समयीं अशा मज वाटतें, भटकूं सुदूर कुठें तरी
मय कौठचें-शशिमित्रता, प्रियकान्तनामजपावली !
हृदयोत्कटा प्रणयोज्ज्वला स्मृति मानसीं उजळूं पुन्हां
विरहानला शमवावया करुं अश्रुंची सुमनावली ! ! !

मनोरमा रा॰

## स्वाध्याय

१. माझी कन्या. बी. ( मुरलीधर आत्माराम गुप्ते ) याच्या ' फुलाची ओंजळ ' या संग्रहांतील कविता वाचा. त्यांच्या इतर कविता संस्कृतप्रचुर व सामान्य वाचकांना दुर्बोध वाटतात. या कवितेंतील तुम्हाला आवडणाऱ्या कल्पना सांगा.

६. मी तुझी मावशी तुला न्यायया आलें ! लक्ष्मीबाई टिळक याच्या ' करंजातील मोदक ' वगैरे ' इतर कविता वाचा. 'संजीवनी' पाक्षिकांत प्रसिद्ध झालेल्या यांच्या ' स्मृतिचित्रें ' या आठवणी वाचा, म्हणजे याचें सूक्ष्म निरीक्षण तुम्हांला कळून येईल. खेडेगांवांतील रहाणीसंबधीं ' सुगी ' या काव्यसंग्रहांतील कविता वाचा.

१७. अर्थोहि कन्या परकीय एव. अशा तऱ्हेचे प्रसग अनेक कादबऱ्यात व नाटकात वर्णिलेले आहेत. भावबंधन नाटकातील धुंडिराजपतांनीं मुलीला आसीर्वाद देतांना केलेलें भाषण वाचून पहा. त्याचप्रमाणें केरळ–कोकिळ-कर्ते कृ. ना. आठल्ये यांची ' सासरची पाठवणी ' व ' माहेरचें मूळ ' हीं काव्यें वाचा.

४८. सुमनावली. रविकिरणमंडळाच्या प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात प्रसिद्ध झालेल्या मनोरमाबाई रानडे याच्या कविता वाचा.

---

# ११ नाविक गीतें

मराठी ललित वाङ्मयांत एका गोष्टीची प्रामुख्यानें उणीव दिसते आणि ती म्हणजे दर्यावरील जीवनचित्रांची. नाथमाधव यांचा 'सांवळ्या तांडेल', आठल्ये, माधवराव काटदरे, आनंद, काणेकर, गडकरी ( राजसंन्यास ), लक्ष्मणराव सरदेसाई ( सुखाचे क्षण ) या थोड्या लेखकांच्या कविता, कादंबऱ्या, नाटकें, लघुकथा हीं वगळलीं, तर नदी व समुद्र यांवर निर्वाह करणाऱ्या लोकांच्या जीवनचरित्रांचा वाङ्मयांत मागमूसहि लागत नाहीं. वास्तविक कराचीपासून गोव्यापर्यंत शेंकडों मैलांचा लांबचलांब समुद्रकिनारा पसरला आहे. लाखों लोक समुद्रावर जीव धोक्यांत घालून उदरनिर्वाह करीत आहेत. प्राचीन काळापासून जलपर्यटन, नौकानयन, जहाजें बांधणें, जलमार्गानें मालाची ने-आण करणें वगैरे उद्योग चालू आहेत. हबशी व मराठे यांचीं मोठमोठीं आरमारें असून त्यांत शेंकडों मराठे, सारंग व खलाशी म्हणून काम करीत असत व आजहि नव्या अमदानींत आगबोटींवर करीत आहेत. आफ्रिकेसारख्या दूरच्या प्रदेशांत निर्वाहासाठीं लोक जाऊन राहिले आहेत. शिक्षणासाठीं, व्यापारासाठीं, चैनीसाठीं आपल्या लोकांच्या विलायतेच्या यात्रा चालू आहेत. महायुद्धाच्या निमित्तानें अनेक अशिक्षित शिपायांना, अर्धशिक्षित कारकुनांना समुद्रप्रवास घडला आहे. पण या सर्व धडामोडीची पुसटमुसट छाया काव्यवाङ्मयांत दिसत नाहीं. बंगाल्यांत नदी हेंच माहतुकीचें मुख्य साधन असल्यामुळें नद्यांचा व कोळी, मोई या जातींच्या जीवनांचा उल्लेख आढळतो. पण उन्हाळ्यांत रोडावणाऱ्या गोदावरी, कृष्णा, प्रवरा या नद्या व पावसाळ्यांतच थैमान घालणारे ओढे प्रत्यहीं दिसल्यावर घाटमाथ्यावरील प्रदेशांत निर्माण झालेल्या मराठी वाङ्मयांत नाविक जीवनाचा उल्लेख नसावा यांत आश्चर्य नाहीं. परंतु ज्यांचा जन्म समुद्रकिनाऱ्यालगतच्या प्रदेशांत झाला व ज्यांची हयातहि तेथेंच जावयाची आहे, अशा कोंकणांतील कवींचें-कवि 'आनंद' खेरीजकरून—जेव्हां इकडे दुर्लक्ष दिसतें, तेव्हां खरोखरच आश्चर्य वाटतें. सौंदर्याच्या आगरात राहूनहि त्या सौंदर्यानें यांची प्रतिभा पल्लवित होत नाहीं !! त्यामुळें नाविक गीतांचा प्रांत अधाप मोकळाच राहिला आहे. पाश्चात्य भाषेंतील कवितांशीं तुलना केली असतां ही उणीव जास्त तीव्र भासते.

४९. कोळ्याचें गाणें. कोळ्याच्या तोंडीं घातलेलें हें नाट्यगीत आहे. भाषा मात्र, कोंकणी माणसाची नसून घाटावरच्या गड्याची भासते व त्यामुळें शुद्ध नागरी भाषेंत काव्य केलें असतें तरी चाललें असतें असें वाटतें. 'पुणीं'तील देहा-

वरच्या माणसाइतका हा कोळी कल्पनाचतुर व रसिक दिसतो. ओहटीच्या वेळीं कोळी मासे पकडण्याला एकटे जातात आणि भरतीच्या वेळीं परत किनाऱ्यावर येऊन सांपडलेलें 'म्हावरं' कारभारणीच्या हवालीं करतात. कित्येकदां त्यांना अंधारांतच समुद्रात रात्र काढावी लागते, तुफानाचे प्रसंगीं जीव धोक्यांत टाकावा लागतो. पण या गीतांतील कोळी मजेनें सकाळच्या रामपाऱ्यात सहल करायला निघालेला दिसतो. याच्या उपमा मात्र मार्मिक आहेत. समुद्र, मासे आणि होडी एवढ्या त्याच्या परिचयाच्या वस्तू.

५०. नाविक. या कवीची 'गोपाळ' ही कविता ( महाराष्ट्र-रसवती, भाग १, पृष्ठ २५ ) तुम्हीं वाचली आहे. कोंकणात वस्ती व सूक्ष्म निरीक्षण याचे परिणाम तुम्हांला ह्या कोंकणगीतात दिसून येतील. शेतकऱ्याचा बैल, स्वाराची घोडी, तशी कोळ्याची नाव. नावेमुळें हा समुद्रात दूर जाऊन उदरनिर्वाहाचें साधन मिळवितो. अर्थात समुद्रात तीच त्याचा आधार. चांदण्या रात्रीं जाळें फेंकून मासे पकडण्यास निघालेल्या कोळ्याचें हें स्वगत भाषण आहे.

## ४९ कोळ्याचें गाणें

आला खुशींत् समिंदर, त्याला नाहीं धिर,
होडिला देइ ना ठरूं,
ग सजणे, होडीला वघतो धरूं !
हिरवं हिरवं पाचूवाणी जळ,
सफेद फेसाची वर खळवळ
मासावाणी काळजाची तळमळ
माझी होडी सर्मिदर, ओढी खार्लीवर,
पाण्यावर देइ ना ठरूं,
ग सजणे, होडीला वघतो धरूं !
तांबडं फुटे आभाळांतरीं,
रक्तावाणी चमकू पाण्यावरी;
तुझ्या गालावर तसें काइ तरी !
झाला खुळा सर्मिदर, नाजुक् होडीवर
लाटांचा पिंगा सुरू,
ग सजणे, होडीला वघतो धरूं !

सूर्यनारायण हंसतो वरी,
सोनं पिकलं दाहिदिशांतरीं,
आणि माझ्याहि नवल्या उरीं !
आला हंसत् समिंदर, डुलत फेसावर,
होडीशीं गोष्टी करूं
ग सजणे, होडीला घरतो घरूं !
गोऱ्या भाळीं तुझ्या लाल चिरी,
हिरव्या साडीला लालभडक धारी,
उरीं कसली ग, गोड शिरशिरी !
खुशी झाला समिंदर, त्याच्या उरावर,
चाले होडी भुरभुर,
ग सजणे, पान्यावर जणूं पाखरूं !

अनंत काणेकर

## ५० नाविक

आजच पुनवा चल ग नावे, नभांत चंद्रम डुले डुले
सवार झाली भरती पुरती थडीथडीनें झुले झुले.
मंगशिराचा मादक महिना शींग तळपते भरी भरून.
नाविक मी तूं नाव ! येउं चल रंग रोजगारिचा करून.
अस्मानांतुन दर्यावरतीं ओघळती चांदिण्या कशा ?
घवल्या पावूल्याचा जणुं पाउस मौक्तिक ओसरे असा.
चिनई चांदी रस फैलावे वल्हें मारतां जलामधून
हिंदुळ्यापरी नाव नाचते झुके अंग चाळिच्या वरून.
मतलय म्हारो मच्छीमारी हेंच गोडगोडसें जिणें
तीन तळच्या पलंगावरळें लोळणेहि त्यापुढें उणें.
जलांत असतांना मज दुनिया दिसे सारखी असून नसून
जन्मापुन मीं तुझ्या जिवावर केला नाविकपणा कसून.
कुडच्याला भगवानाचाणीं हात कैवदां दिला असे
तुझ्या सहेलीवांचुन असलें भाग्य मात्र लाभणें नसे

रानावयूला जसा पारधी, नाविक मी सागरांतला
विजलीवाणी तुझी चुणुक वारुळींतील वारुणी मला.



तुझ्याच नादीं मघापून मी ! थांब एपे फेकितों जरा–
सोनेरी पागळें जळावर, धंदा तर होउंदे पुरा.
"सागावाणी ताठ होउनी पिस्कारी पागळें धरून्
आसमंत भागांत तयाची निश्चळता राहिली पुरून्."

आनंद

### स्वाध्याय

४९. **कोळ्याचें गाणें.** या कवितेंतील शब्दांत नादमाधुर्य आहे. चालीमध्यें तुम्हांला समुद्राच्या लाटांचा भास होईल व खव्याळ समुद्राचा खेळ शब्दांत प्रतिबिंबित झाला आहे असें वाटेल. समुद्राच्या वर्णनापेक्षां किंवा कोळ्याच्या मनस्थितीपेक्षां कवीनें चित्रें रेखाटण्यावरच जास्त कौशल्य खर्च केलें आहे. लाटांवर पोहत जाणाऱ्या होडीचें हें चित्र आहे.

पाचू, सोनें, चिरी यांचे अर्थ सांगा.

५०. **नाविक.** या कवितेंतील प्रांतिक शब्द निवडून त्यांचे अर्थ करा.

शेंग, सवार, भरती, मतलय, पागळें, माग, चिनई चादी या शब्दांनीं कोणत्या कल्पना व्यक्त केल्या आहेत तें पहा.

---

## १२ कल्पनाविलास

महाराष्ट्र-रसवतीच्या पहिल्या भागांतील पृष्ठ ५० ते ५७ मधील विवेचन व कविता पुन्हा एकदां वाचून पहा. तत्त्वविवेचन किंवा शब्दांची मोहक रचना यांत गुंगून न जातां, पृथ्वीवरील सत्य पण नित्य परिचयाच्या वस्तू व विचार यांच्या जाळ्यांतून सुटून स्वच्छंदपणें कल्पनातरंगांवर कवि पोहूं लागला म्हणजे अशा तऱ्हेची कविता निर्माण होते. त्याच्या प्रतिभाशाली बुद्धीला जीं मनोरम कल्पनाचित्रें दिसतात, तीं तो वर्णन करूं लागतो. या नवीन दृष्टीनें दिसणाऱ्या पण इतरांस अदृश्य अशा सृष्टींत सर्वच कांहीं अघटित, अतर्क्य व विलक्षण असतें. यांच्या सृष्टींतील मुलें अतिशय भावनातरल; अप्सरा, वनदेव यांनीं वनें भरून गेलेलीं. जगांतील ओंगळवाण्या गोष्टी, निर्दय मनुष्यें, घातपात व सृष्टीचें क्रूर स्वरूप कवीनें नजरे-आड केलेलें असतें आणि रम्य व मायाळू सृष्टि, प्रेमळ मनुष्यें, आनंदी व परोपकारी देवता यानींच सर्व विश्व व्यापलेलें असतें.

५१. **वागेत वागडणाऱ्या लाडक्या लहानग्यास.** या कवितेसंबंधीं रा. ग. हर्षे म्हणतात, ' या ( बाल्यपर ) कवितेंतील अत्युक्ति व गांभीर्याचा अतिरेक सोडल्यास केशवसुती थळणाची ही कविता खरी आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.' ( गोविंदाग्रज—काव्यपरीक्षणात्मक निबंध. )

या कवितेंत वर्णन केलेलें लाडकें बाळ सृष्टींतील सुंदर सुंदर देखावे पाहून, त्यांवर मोहून जाऊन त्यांच्या पाठीमागे धांवत आहे. पण वेड्या मायेच्या पोटीं गोष्टी भीति असल्यामुळें 'तू मा धावूं नकोस,' असें कवि म्हणतो.

'माझें मग तें फूल कोणतें कसें ओळखूं सांग,' असें कवि विचारतो. तुझी चपल वायुवृत्ति, स्वच्छंदी वागणें, इंद्रधनुष्याकारखें मोहक रूप! बाळाचें हें वर्णन व त्याच्याप्रमाणें दिसणारे देखावे किती उत्कृष्ट रीतीनें रंगविले आहेत. पण ही कविता मनाला विषण्ण करते, बाल्यपणाची व आयुष्याची क्षणभंगुरता दाखविते. कवीच्या स्वतःच्या निराशावृत्तीचा पगडा कवितेवर उमटलेला दिसतो.

**५२. सावल्यांचें गाणें.** वरील कवितेच्या उलट ही कविता पहा. उजेड आहे म्हणून सावली उत्पन्न होते. प्रत्येक वस्तूला सावली चिकटली आहे. ही सावली निर्जीव असते असें इतर लोक म्हणोत, पण कवीनें येथें तिचें असें कांहीं मजेदार वर्णन केलें आहे कीं, कविता वाचल्यावर मुलांची अंधाराची व सावलीची भीतीच नाहींशी व्हावी. या सावल्या म्हणजे मोठीं खोडकर पोरें; पण त्या संध्याकाळीं नमस्कार घालतात, गुपचूप रात्रीच्या–आपल्या आईच्या–मांडीवर निजावयास जातात, याना कशाची भीति वाटत नाहीं. वाटेल तेथें, उजाड ठिकाणीं जातील. कोणी मनुष्य भ्याला, तर त्याला हसूं येतें त्याचें. या कवितेंतील कल्पनाविलास किती उच्च प्रकारचा आहे!

**५३. तें पाउल कुणाचें?** महाराष्ट्र-सरस्वतीच्या दुसऱ्या भागातील वनविहा-रातील उतारा वाचून साधुदास कवीच्या संस्कृतप्रचुर भाषाशैलीची व अलंकारांनीं नटलेल्या काव्यप्रकाराची कल्पना आल्यानंतर ही कविता वाचून तुम्हांला विस्मय वाटेल. सोपे पण मधुर शब्द, अभिनव कल्पना, गूढ विचाराची प्रेरणा करण्याचें कौशल्य या लहानशा कवितेंत तुम्हांला दिसेल. कुणीतरी अंगणात पावलें उमटवीत चाललें आहे. मऊ जमिनीवर तळव्याच्या रेषा उमटल्या आहेत; गुलाबी रंग दिसतो आहे, पायांतल्या पैंजणाचे मणी विखुरले आहेत, पहाणाराची दृष्टि आकाशरूपी जमिनीवर व चालणारी व्यक्ति त्यापलीकडे वर, अदृश्य असल्यामुळें ठिकठिकाणीं पाउलें उमटतांना दिसत आहेत. कोणाचें वर हें पाऊल, असें कुतूहल वाटूं लागतें. कवीला पारदर्शक निळ्या अंगणात, आकाशात, आकाशगंगा, तारे, सप्पाकाळचे रंग दिसतात, स्वर्गीय संगीत ऐकूं येतें, सूर्यचंद्राचीं बिंबें व इंद्रधनुष्याच्या कमानी दिसतात आणि मग त्याला प्रश्न पडतो कीं 'हें पाउल कुणाचें?'

५४. झिम्मा. केशवसुतांची 'झपूर्झा' ही कविता लोकांना त्यांतील गूढ विचारांमुळें व चमत्कृतिजनक कल्पनेमुळें आवडली. जुन्या विचारांच्या टीकाकारांना ती वेडगळ वाटल्यामुळें व आधुनिक चिकित्सकांनी निरर्थक ठरविल्यामुळें ती कविता विशेषशी लोकप्रिय झाली नाहीं. 'झिम्मा' ही कविता आकर्षक चालीमुळें व प्रसादांतील काव्यमय कल्पनांमुळें-'आकाशींचे तारेसुंगें'-लहान मुलांमुलींनासुद्धां ती अति प्रिय झाली. आणि मराठी कवितेच्या 'लोकप्रियतेचें गमक जें अनुकरण, तेंहि या कवितेच्या वांट्याला भरपूर आलें. कवि गिरीश व इतर अनेक कवींनी या चालीवर व धर्तीवर कविता लिहिल्या. प्रो. माधवराव पटवर्धन यांनी बडोदें साहित्य-संमेलनाच्या (१९३४) काव्यविभागाच्या अध्यक्षपदावरून या अनुकरणासंबंधीं खरमरीत टीका करून, 'खेळूं ये' या शब्दांचेंसुद्धां किती अंधानुकरण झालें आहे, त्याचें खोंचदार दिग्दर्शन केलें आहे. झिम्मा खेळतांना येणारी धुंदी व आवेश हीं इतकीं तीव्र वाटतात कीं, एकदां झिम्मा खेळण्याचें वेड डोक्यांत शिरल्यावर बेभान होऊन आकाशांत जें दिसेल त्याच्याशीं, पोरीबाळींशीं, म्हाताऱ्या आजीशीं सुद्धां झिम्मा खेळण्यास कवि तयार झालेला पाहून गंमत वाटते. अंधारी रात्र, झंझावात यांची पर्वा न करतां लाडक्या आजी, हांसऱ्या ज्योती, लाजऱ्या व नाचऱ्या पोरी यांच्याशीं झिम्मा खेळण्यास बोलावणारी कविता लहान पोरीबाळींना आवडते यांत आश्चर्य नाहीं. अनपेक्षित व असंभाव्य उद्गारांमुळें ही कविता सुंदर भासते.

५५. एका रात्रीची गंमत. कवि माधव यांच्या सृष्टिवर्णनाच्या व ऐतिहासिक स्वरूपाच्या कविता तुम्ही 'महाराष्ट्र-रसवंती' च्या पहिल्या दोन भागांत अभ्यासिल्या आहेत. आतां या दोन कविता पहा. बालकवि ठोमरे यांची 'फुलराणी' आणि 'आनंदी आनंद' या कवितांत अनुभविलेला आनंद यांत पुन्हा तुम्हांस अनुभवावयास मिळेल. मराठी वाङ्मयांत अद्भुत कथा ( Fairy Tales ) दुर्मिळ आणि अद्भुत कविता तर नाहींत म्हटल्या तरी चालेल. लोकांचा भुतांखेतांवरील विश्वास, राक्षस, बागुलबोवा व अवार यांची मुलांच्या मनात भीति उत्पन्न करून देण्याची दुष्ट पद्धति, यामुळें सुस्वभावी यक्ष व वनदेवता आधुनिक मराठी वाङ्मयांत फिरकतांना तर दिसत नाहींतच, पण परभाषांतील रूपांतरांच्या मिषानेंहि, गोष्टीप्रमाणें अजून मराठी काव्यवाङ्मयांत त्या उतरल्या नाहींत. या दृष्टीनें कवि माधव यांची ही कविता तुम्हांला आवडेल. वर्णन साध्या शब्दांत असून, कल्पनाहि ... असल्यामुळें कविता समजण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं. कवितेंत वर्णन

केलेलें दृश्य एकाद्या सुंदर चिमकुल्या स्वप्नाप्रमाणें वाटतें. चंदनहिरा व वनाई ही वनदेवांची राजाराणी, चिमकुले वनदेव, जलांतील अप्सरा ( आसरा = जलदेवता ) यांची कल्पित सृष्टि पाहून शेक्सपियरच्या 'मधुयामिनी स्वप्न' ( Midsummer Night's Dream ) या नाटकाची तुम्हांला आठवण होईल.

५६. संत तुकाराम. 'महाराष्ट्र-रसवतीच्या दुसऱ्या भागांतील कृ. ना. आठल्ये यांच्या 'तुफान' या कवितेची व प्रस्तुत कवितेची तुलना करा. म्हणजे काव्यमय वर्णन व कल्पनातरल काव्य यांतील फरक तुमच्या तावडतोब लक्षांत येईल.

१२ नोव्हेंबर १९२७ रोजीं भयंकर वादळ होऊन इंडियन को-ऑपरेटिव्ह नॅव्हिगेशन कंपनीची संत तुकाराम आगबोट कोंकण किनाऱ्यानें जात असतां हबसाणाच्या किनाऱ्याजवळ बुडाली. बोटीवर त्या दिवशीं नेहमींचा कप्तान नसून, फकीरा नांवाचा कप्तान होता व आगबोटीवर तुकाराम महाराजांची भजनमग्न स्थितींतली तसबीर होती. या अपघातांत अनेक कुटुंबांतील नानल्या नाहींसे झाल्यामुळें कोंकणांतील रहिवाश्यांना या प्रसंगाची स्मृति अनेक वर्षे ताजी राहील. कवि मूळचा कोंकणांतील, ऐतिहासिक बाबांविषयींचा त्याचा आदर व कल्पनातरल वृत्तीनें काव्य करण्याची त्याची आवड या गोष्टी लक्षांत ठेवल्या तर कवितेचें स्वरूप तुम्हांला समजेल. कवितेच्या ओळी चालीमुळें लाटांप्रमाणें भासतात. तुकाराम गोसाव्याला फकीरा कप्तान सोबती आवडला किंवा या समुद्रावर आंबे उगवले व गेले या कल्पनांतील विनोद एका क्षणीं कपोलावर हास्याची खळी पाडतो तर दुसऱ्या क्षणीं गतस्मृतीमुळें मन विषण्ण होऊन कपाळावर आंठ्या चढतात. कवीनें निळावती ही समुद्राची स्वामिनी, इंद्रजाल उत्पन्न करणारी, कप्तानांना भुलवून आपल्याकडे बोलावून, जहाजें बुडविणारी देवता कल्पिली आहे, व संत तुकाराम बोट तिनें बुडविली अशी अद्भुतरम्य कल्पना केली आहे ग्रीक पौराणिक कथांतील मोहिनी ( Siren ) अशाच होत्या. कविता एकसारखी वाचत गेलें तर तें भयानक दृश्य आपल्या डोळ्यांसमोर चाललें आहे असा भास होतो व यातच कवीचें कौशल्य व कल्पनाचातुरी ही दिसून येतात. कवीनें मेघोदकाचे थेंब याबद्दल द्रप्स हा अपरिचित संस्कृत शब्द प्रस्तुत कवितेंत वापरला आहे. सकृद्दर्शनीं तो इंग्रजी Drops चा अपभ्रंश वाटतो.

बालकवीनंतर दंतकथांत गुंगून जाणारे, जुन्या यक्ष, किन्नर गंधर्व इत्यादींच्या मालिकेंत नवीन [illegible]

हेच पहिले मराठी कवि होत. ऐतिहासिक सत्य, प्रचलित दंतकथा, गोड व भ्रामक कल्पनाविलास यांचा मिलाफ या कवितेंत तुम्हांला दिसेल.

## ५१ बागेंत बागडणाऱ्या लाडक्या लहानग्यास

*थांब जरासा बाळ!* ॥ ध्रु. ॥

सुंदर ऐशा प्रभातकाळीं,
पहूं कडे हीं फुलें उमललीं,
बाग हांसते बाटे सगळी!
शीतल वारा, या जलधारा कारंजाच्या छान!
*थांब जरासा बाळ!*

रम्य तडागीं निर्मळ पाणी,
गाति पांखरें गोजिरवाणीं,
आनंदाचीं बसलीं ठाणीं,
*खरें असे रे! तरी नको रे मारुं लाडक्या धाव!*
*थांब जरासा बाळ!*

पाहुनि सौख्याचा हा ठेवा,
सृष्टि करीलचि माझा हेवा,
माझ्यापासुनि घ्यावा,
यत्न परोपरि, करितिल सारीं! भुलशिल तूं हडिवाळ!
*थांब जरासा बाळ!*

तऱ्हेतऱ्हेचीं फुलें विकसलीं,
रंगी बेरंगी हीं सगळीं,
तूंही शिरतां त्यांच्या मेळीं
माझें मग तें, फूल कोणतें कसें ओळखूं सांग?
*थांब जरासा बाळ!*

बघ सुटला हा मोठा वारा
वायुवृत्ति तव देहहि सारा!
उडवुनि नेइल तुला भरारा!
दिगंतराला, जातां बाळ! पुन्हा कसा मिळणार!
*थांब जरासा बाळ!*

स्वच्छ तडागीं प्रतिबिंबातें,
पाहुनि वेड्या धरावयातें,
बुडुनी जाशिल पाताळातें !
तयासारखा, क्षणीं पारखा होशिल या आम्हांस !
थांब जरासा बाळ !

किती बुडबुडे पाण्यावरती,
इकडुन तिकडे तरंगताती,
चंचल लहरी तूं त्या साथी,
क्षणांत या रे, लपाल सारे, काळाच्या उदरांत !
थांब जरासा बाळ !

फूलपांखरें हीं स्वच्छंदीं,
*तूंही त्यांच्यासम आनंदी*
क्षणांत पडशिल त्यांच्या फंदीं !
त्यांच्या संगें, त्यांच्या रंगें, जाशिल उडुनी दूर !
थांब जरासा बाळ !

अशा तुला मग बागडतांना,
भरभर वाऱ्यावर फिरतांना,
फुलांत दडतां कीं उडतांना,
कवण उपायीं, आणूं ठायीं, पुन्हा लाडक्या सांग !
थांब जरासा बाळ !

शब्दावांचुनि मंजुळ गाणें,
( अर्थ तयाचा देवचि जाणे ! )
गाइल माझें गोजिरवाणें,
ससमुरांपरि या वाऱ्यावरि विरुनी जाशिल पार !
थांब जरासा बाळ !

बालरवीचे किरण कोवळे,
झाडांवर पडति मोकळे

रंग, खेळती हिरवे पिवळे,
धरावयासी, त्या रंगांसी, जाशिल बाळा खास !
थांब जरासा बाळ !

अज्ञावेगळी अमूर्त मूर्ति,
कल्पकतेची की तूं स्फूर्ति,
पुण्याची मम आशापूर्ति,
रविकिरणावरि, जळधारांवरि, तन्मय होशिल पार !
थांब जरासा बाळ !

गोविंदाग्रज

## ५२ सावल्यांचें गाणें



[ जाति : बालानंद ]

तेजाचीं आम्ही बाळें
रूप जरी अमुचें काळें !
ल्हान या कोणी मोठीं !
ससेमिरा अमुचा पाठीं !
जनीं स्मशानीं कुठें तरी,
अशीं तरळों पिशांपरी.

*

मेघांच्या काळ्या पंक्ती
निळ्या नभीं जेव्हां फिरती,

राक्षसरूपांना धरनी
सिंधूच्या पृष्ठावरुनी
मंद मंद आम्ही फिरतों;
निळ्या जळा काळें करितों !

*

पीतारुण संध्या बघुनी
पंदन दीर्घ करू पडुनी !
मग येई रजनीमाई
पदराखालीं आम्हां घेई.
चांदण्यांत अमुची माया
भुताटकी गमते हृदया.

*

पांडुरक्या तेजांतून
कुठें कुठें बसतों दडुन.
पांडुरक्या वाटेवरनी
एकलेच फिरती कोणी,
लपत छपत पाठुनि त्यांच्या
फिरत असूं आम्ही वेड्या

*

पानांचें पसरुनि जाळ
आणिक पारंब्या लोळ,
वट कोणी ध्यानस्थ बसे;
मंद अनिल त्या झुलवितसे
मग अमुचीं रूपें झुलती;
बाळांना बागुल दिसती !

*

जुनाट हे पडके वाडे,
पर्णहीन त्यांतिल झाडें

धवल चंद्रिका रंगविते;
आम्ही मग त्यांतिल भुतें !
जर का कुणि चुकुनी आला
वाटसरु रात्रींमधला,
बघुनि विकट अमुचे चाळे
घाबरुनि तो मागेंच वळे !

*

प्रेमस्थळ अमुचें एक;
त्यासाठीं विसरुनि भूक,
दाहि दिशा मागुनि फिरणें
जीवाभावानें जपणें !
ही अमुची वेडी प्रीत
धिक्कारा मारा लाथ !

अनंत काणेकर

## ५३ तें पाउल कुणाचें

पद—( चाल—सृष्टीचा लडिवाळ बाळ )

गगनाच्या अंगणीं । उमटलें पाउल शुभलक्षणीं ॥
नाजुक गोंडस असे कुणाचें सांगा मजला कुणी ॥ ध्रु० ॥
संध्यारागांतुनी । तयाचा तळ दिसतो साजणी ॥
स्वर्गंगेसम रेषा दिसती कधीं कधीं ज्यांतुनी ॥ १ ॥
पाउल पडतां क्षणीं । जाहली तुटातूट पैंजणीं ॥
कांहीं अस्ताव्यस्त विखुरले नक्षत्रांचे मणी ॥ २ ॥
कांहीं उरले गुणी । तयांतुनि रुणझुण उठतो ध्वनी ॥
कानीं येतो अव्यक्ताच्या तो अवकाशांतुनी ॥ ३ ॥
गगनीं एके क्षणीं । दुज्या तें उठतें क्षितिजांतुनी ॥
पाउल दिसतें परी तयाचा कोण असावा धनी ? ॥ ४ ॥

साधुदास

## ५४ झिम्मा

झिम्मा खेळूं ये झिम्मा नाचूं ये
आकाशींचे तारेसंगें—झिम्मा खेळूं ये.
अंधारी ही रात्र काळी
कोणी पाहीना मुळींही
ीच अंतराळीं—झिम्मा खेळूं ये.
सप्तर्षींमध्यें सती
बैसलीसे अरुंधती
ऱ्या या आजीसंगें-झिम्मा खेळू ये.
चांदण्यांत चंद्रज्योती
हिमगिरी चकाकती
ऱ्या या ज्योतीसंगें—झिम्मा खेळूं ये.
चवथीची चंद्रकोर
हळू चाले सुकुमार
..जऱ्या या पोरीसंगें-झिम्मा खेळूं ये.
काळ्या मेघांमागे जाऊं
वीज नाचे पैंज लावूं
नाचऱ्या या पोरीसंगें-झिम्मा खेळू ये.
दक्षिणेचा झंझावात
रानफुलें उफाळत
झंझावातीं दोघे रंगूं-झिम्मा खेळूं ये

रघुनाथ दत्तात्रय सरं

## ५५ रात्रीची गंमत !

वनीं गालिच्यावरी फुलांच्या चमकला चन्द्रहिरा,
वनदेवांचा चिमणा राजा, चनाढ्या नोवरा,
सन्निध त्याच्या चमकली त्याची चिमणी ती नोवरी
इवलीं इवलीं पुष्पभूषणें घालुनि अंगावरी.

"काय संतराया?—योजिलें—निज चित्तीं आज"
भजन करित ऐसे—चाललां—कुठें महाराज!
सोयति निम्याचा—आज कां—तुम्हां अंतरला?
कीं गोसाव्याला—सोयती—फकिर वरा गमला!

"नव्हे चंद्रभागा,—नव्हे हें—इंद्रायणिनीर?
भवत्पदांतालीं—उसळवो—समुद्र गंभीर?
याच्यावरि झाला—मराठी—नशिबाचा खेळ!
एहरींतुनि याच्या—उगवले—गेले सखेल!

"राजा उदकांचा—वरुण जो—वैदिक काळींचा,
तो सत्ताधारी—भाजला—केवळ नांवाचा!
उदकांवरि सत्ता—गाजवी—आज निळावंती!
श्रावणि पुनवेच्या—श्रीफळें—तिज नाहीं तृप्ति!

"तिच्या इन्द्रजालें—आज हें—उठलें काहूर!
तिच्या इन्द्रजालें—आज हें—औळ करी जोर!
तिच्या इन्द्रजालें—जाहला—अदृश्य रविराणा!
तिच्या इन्द्रजालें—घालिती—भूतें धिंगाणा!

"नभ मडकी द्रप्स—जशी कुर्गि—सडकावी रेव!
घोंगावत धावे—प्रभंजन—रूप वायुदेव!
क्षुब्ध सृष्टि झाली—जलाना—रौद्रपणा आला;
तुफान दर्याचा—नागवा—नाच सुरू झाला!

"कटाह सळसळतो—तसा हा—दिसे सिंधुराज!
बोटीचा झाला—रज्जुविण—पाळणाच आज!
कळेल केव्हां—तयाचा—नेम नसे कांहीं,
तुमचें तरि चाले—सारखें—'विठ्ठल-रखुमाई'!

"काय न जाणवतो—तुम्हाला—हा वारा डौली?
कीं जलराणीच्या—मोहिनी—मनाची पडली?
कीं भजनानंदीं—राहिली—टाळुनियां टाळी?
जाणिव बाह्याची—आपुली—तेणें मावळली"?

पुढतीं बाजूला—तडाखे—दे धारापाणी,



कांपित तरि वाट—चालली—तुकयाची तरणी !

पर्वतमय लाटा—मांडिती—खोळण चौफेर,
व्यसनीं त्रिज बघुनी—हांसती—निर्दय भेसूर !

निघुनि जाय मागें—जंजिरा—हिरव्या हबशाचा,
श्रीवर्धन गांव—तसा तो—प्रधान पंतांचा,
फेंकित तरि वरतीं—धुराचे—लोटांवरी लोट
झगडत लाटांशीं—चालली—तुकयाची बोट !

सुवर्णदुर्गाला—डावलुनि—करि बंदर जवळी
उतारुंना उतरूं—देइना—परि वारा जौळी !
गांठावें पुढचें—म्हणोनी—बंदर तें थेट
झगडत वाऱ्याशीं—चालली—तुकयाची बोट !

पुढतीं बाजूला—सडाखे—दे वारापाणी,
कापित तरि बाट—चालली—तुकयाची तरणी !
सुटेल ही आतां—आपुल्या—हातांतुनि पुरतां,
करि म्हणुनी कावा—चेटकी—दुष्ट निळावंती !

लाटेवरि एका—राहुनी—उभी पुरोमार्गीं
'ये, ये, ये इकडे!'—सुणावी—हातें नीलांगी !
मूर्ति तिची बघुनी—जाहला—भास फकीरातें
उठला जळखांब—सागरीं—गिरगिरत्या वातें !

परतविली त्यानें—भीतिनें—बोट तुकाराम !
निळावंतिचें तें—जाहलें—सुलभचि मग काम !
विकट हास्य करुनि—बोटिची—पाठ तिनें धरिली !
फौज तिची सगळी—तियेच्या—मदतीला उठली !

करुनि द्रप्सांचा—सारखा—अस्मानी मार,
झंझावातानें—आपुला—वाढविला जोर !
जीवांचे हाल—बोटिंतिल—वर्णावे काई ?
बमले कुणि हिरवे—कुणाला—शुद्धबुद्ध नाहीं !

देवाला हांका—मारिती—दीनपणें कोणी,
आयकुनी त्यांतें—चेटकी—हांसे जलराणी !

तुकयाचा ज्यानें—जलांतुनी—उद्धरिला गाथा,
रचे म त्या तरणी—तारणें—पंढरीच्या नाथा !
भजन घरीं करिती—तुकोबा—'विट्ठल-रखुमाई' !
उठति काळलाटा—धांवते—मधुनि तुकयाई !
घालाया शक्ति—शेवटीं—तिज नाहीं उरली !
सुटुनिया चाल—तुकाई—शत्रुकरीं पडली !
जलरूपी जबडा—उघडला—खालतीं काळाचा !
क्षणीं तयें केला—ग्रास त्या—दुबळ्या तरणीचा !
उठली किंकाळी—मिळालें—पाण्याला पाणी !
मळी घेउनि अपुले—लोपली—उदकांची राणी !
निमुतळीं थमलें—आनदरि—जाउनि तें कांहीं
याद जगीं शब्द—तयाचा—कधिं उठला नाहीं
मत तुकाराम—बुडाली—परंतु ज्या ठायीं,
शब्द म्हणुनि उठती—तेथुनी—"विट्ठल-रखुमाई" !

माधव

## स्वाध्याय

५१. वागेंत धागडणाऱ्या लाडक्या लहानग्यास या कवितेंत गोंविलेल्या कल्पनेची नाट्यछटा तयार करा कृष्णाजी केशव दामले ऊर्फ केशवसुत यांच्या पुढील कविता वाचा :—भृंग, फुलाची परसरण, पुष्पाप्रत, वातचक्र, म्हातारी, फुल्पाखरू, देवाचें येव. केशवसुतांच्या कल्पनाशक्तीची ओळख तुम्हांला त्यावरून होईल व गोविंदाग्रजांच्या या कवितेवर केशवसुतांच्या कवितेचा कसा परिणाम झाला आहे तें समजेल.

५२. सावल्यांचें गाणें कवितेंतील कल्पनाचा उपयोग करून घेऊन सावल्यावर एक गोष्ट लिहा.

५३ हें पाउल कुणाचें ? इंग्रजी कवि कीट्स् याची Autumn (शरदृतु) ही कविता वाचा. सृष्टींत घडत असलेल्या कृतींवर व्यक्तींचा आरोप करण्याची

कवीची पद्धति असते. पण या कवितेंत फुलें दुसऱ्या अज्ञान व्यक्तीच्या आहेत अशी कल्पना केली आहे. रवींद्रनाथ टागूर यांच्या कवितांतून या प्रकारच्या कविता शोधून काढून वाचा. हें पाउल कुणाचें आहे, असें तुम्हाला वाटतें ?

५४ झिम्मा. केशवसुताची 'झपूर्झा,' गिरीशाची 'झोका' व याच मासल्याच्या दुसऱ्या कविता वाचा
केशवसुतांच्या 'झपूर्झा' या कवितेवरील चर्चात्मक लेख वाचा

५५. एका रात्रीची गंमत शेक्सपीयरच्या 'मधुयामिनी स्वप्न' या नाटकाचें सविधानक शिक्षकांकडून समजावून घ्या इंग्रजी काव्यात तुम्हाला अनेक वनदेवींच्या कविता (Fairy Poems) आढळतील, त्यातील काहीं वाचा किंवा शिक्षकांकडून समजावून घ्या.

५६ संत तुकाराम रेंव=वाळू सखेंल=आंग्रे सरकारचा किताब द्रप्स=मेघोदकाचे थेंब. जीळ (जवळ, जऊळ) = वादळ सड्की = मारा करते. याच कवीची या भागातील 'जंजिरे विजयदुर्ग' ही कविता वाचा

'शब्द अजुनि..... रखुमाई' या तऱ्हेची कल्पना दुसऱ्या कोणत्या कवितेंत तुम्हीं वाचली आहे ?

'तुकयाचा गाथा' या ओळीचा सदर्भ सागा.

---

# १३ संकीर्ण

कवि जेव्हा एखादी कविता लिहावयास बसतो तेव्हा तो नेहमींच काहीं विशिष्ट हेतु मनात वाळगून ती लिहावयास बसतो असें नाहीं एकादा विचार, एकादें दृश्य, एकादा प्रसग जेव्हा त्याचें हृदय हेलावून सोडतात, त्यावेळेस त्याचें प्रकटीकरण केल्याशिवाय त्याला राहवत नाहीं हें प्रगटन गीतरूपानें बाहेर येतें मोराला नाचताना तुम्हापैकीं कोणीं पाहिलें आहे ? त्याचें तें नृत्य अत्यत मनोहारी असतें पण तें नृत्य तो काहीं मुद्दाम करीत नाहीं त्याला आनद झाला, विकार मनात

मावेनासे झाले म्हणजे त्याच प्रगटन केल्याशिवाय त्याला राहवत नाहीं आणि म्हणूनच नृत्यद्वारा तो तें प्रगट करीत असतो कवीचेंहि असेंच आहे

प्रस्तुत विभागांत विविध प्रकारच्या कविता घेतल्या आहेत त्या तुम्हीं स्वतंत्रपणें वाचून त्यातील रसास्वाद घ्या काव्याचा आत्मा व त्याचें शरीर यांचें परीक्षण कसें करावें हें तुम्ही यापूर्वीच्या कविता वाचीत असता शिकला आहात, त्याचा उपयोग या कविता वाचीत असतां करा या कवितांसबंधीचें खालील दिग्दर्शन तुम्हाला या 'परीक्षणांत' सहाय्य करील

५७ एक अमेरिकन मुलगी रे नारायण वामन टिळक ह्याचा, ते स्वत खिस्ती असल्यामुळे, अमेरिकन मिशनऱ्यांशीं निकट संबध होता अशाच एका अमेरिकन मिशनऱ्याची मुलगी पाहून त्यांना ही कविता स्फुरली यांत एका सुदर, आनंदी मुलीचें त्यांनीं वर्णन केलें आहे यात मालप्रदेशाला दिलेली 'केवड्याच्या पानाची,' त्यावर रुळणाऱ्या काळ्या केसाच्या बटांना 'अलीं'च्या अगांची, आरक्त ओठांना पोंवळ्याच्या 'वेला'ची उपमा किती मार्मिक व रम्य आहे ! कवीला त्या मुलीची बुद्धि मनाची सरलता व उदारता, तिच्या चेहऱ्यावरील प्रसन्नता व तिचें सौंदर्य हीं पाहून बाल्य ही फार सुखी अवस्था वाटू लागते ही मुलगी म्हणजे मूर्तिमंत सृष्टिसौंदर्य, स्फूर्ति किंवा रसिकता आहे अशी तो कल्पना करतो

५८. होनाजी बाळ. या कवितेचे कर्ते प्रो ना के बेहेरे हे नागपूरचे रहिवाशी असून, यांनीं टीकालेख, कादबऱ्या, ऐतिहासिक ग्रंथ व कविता वगैरे बरेंच वाङ्मय लिहिलें आहे मराठी भाषेचे व महाराष्ट्रीय सस्कृतीचे हे बडवे अभिमानी आहेत होनाजी बाळाची कविता वाचून पूर्व कवींची व वर्तमान-कवींची त्याना एकाच वेळेला आठवण होऊन, सद्य परिस्थितीबद्दल जी एक प्रकारची विषण्णता वाटली तिचें प्रतिबिंब या कवितेंत पडलें आहे

५९. पहा हो कसा हा कारागीर भास्कर रामचंद्र तांबे याची कविता बहुरंगी व बहुढंगी आहे काव्यविषयाचा त्याचा अभ्यास अतिशय खोल असून अलीकडे त्यांच्या कवितेंत गूढसशोधनप्रवृत्ति अधिक दिसते

कारागिराची कारागिरी पाहून आपणास त्याचें कौतुक वाटतें, त्याबद्दल आदर वाटू लागतो सृष्टींतील नानाविध चमत्कार पाहूनहि असेंच कौतुक वाटतें आणि

रें घडविणारा कोणी तरी मागें असला पाहिजे असें वाटून, त्या अज्ञात कारागिरा-पुढें मान आदरानें लववावीशी वाटते. श्री. तांबे यांनी कवितेंत या अज्ञात कारागिराच्या कारागिरीचें विस्मयपूर्वक वर्णन केलें आहे. तसेंच कोणत्याहि कृतीचा कोणीतरी कर्ता असला पाहिजे, हा व्यावहारिक सिद्धान्त लावून, सृष्टींतील या कारागिरीचा कारागीर कोणीतरी असलाच पाहिजे, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

६०. **घनाभिनंदन.** बडोयाचे राजकवि चंद्रशेखर ( चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे ) यांची कविता प्रासादिक, नादमधुर, अलंकारमंडित व जुन्या कवितेच्या धर्तीवर असते. 'उपडं गुपित' या कवितेंत त्यांनी शेतकन्यांच्या रहाणीची कथा खेडवळ मार्गेत वर्णन केली असली, तरी एकंदरींत त्यांची कविता नव्या जुन्या युगांच्या संधिकालांतली भासते.

ही कविता इंग्रजी स्तुतिगीतांच्या ( Ode ) धर्तीवर लिहिली आहे.

६१. **प्रबोधन.** एकनाथ पांडुरंग रेंदाळकर हे एक प्रतिभावान् कवि होते. एका काळीं गोविंदाग्रज, ठोमरे, टिळक, तांबे, चंद्रशेखर या कवींबरोबर त्याची गणना करण्यांत येत असे. त्यांचा संस्कृत काव्याचा अभ्यास, इंग्रजी काव्याच्या परिशीलनामुळें आलेली नवीन दृष्टि व रसिक ध्येयप्रधान मनोवृत्ति, यांचें मिश्रण त्यांच्या काव्यांत आढळतें. 'प्रबोधन' या गीतांत कोणी तरुण प्रभातसमयीं आपल्या सखीस जागृत करीत आहे अशी कल्पना केली आहे. समयास उचित अशी भूपरागांतील चाल, प्रात:काळचें सुंदर शब्दचित्र, यामुळें ही कविता लोकप्रिय झाली. महाराष्ट्र–रसवंती भाग २ रा, पृष्ठ ५९ वरील 'प्रबोधन' या कवितेंतील वर्णन जास्त काटेकोर असलें, तरी रेंदाळकरानीं प्रस्तुत कवितेंत जास्त मोहक व आकर्षक वातावरण उत्पन्न केलें आहे.

६२. **कुमारी पिरोजा.** माधव ज्यूलियन् यांच्या रेखीव शब्दचित्रलेखनाचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. पारसी मुलगी, तिचा पोशाख, तिचें साधेपण, तिची निष्पाप खेळाडू वृत्ति, फुलवेडेपण, हीं सर्व किती वेंचक शब्दांत त्यांनी डोळ्यांसमोर उभीं केलीं आहेत! 'किती हळू या सुरेल ताना! वाटे येती कान फुलाना' ही कल्पनाच किती मोहक आहे!

**६३ आळंदीची पालखी** अभंग वृत्ताचा उपयोग प्राचीन त्याचप्रमाणें अर्वाचीन कवींनीं देवाची आळवणी करण्यासाठीं केलेला आहे मनातील उद्वेगाला किंवा तळमळीला बाहेर वाट करून देण्याचें तुकारामाचें हें एक साधनच होतें

वारकरीपंथाच्या लोकाची अशी एक प्रथा आहे कीं, ज्ञानेश्वराच्या समाधि-स्थानापासून ( आळंदी ) पंढरपुरास पालखी न्यावयाची, तिच्याबरोबर वाटच्या यात्रेकरूनीं येऊन मिळावयाचें ज्याना आळंदीस किंवा पंढरपुरास पालखीबरोबर जाणें शक्य नाहीं अशा गांवोगांवच्या लोकांनीं त्याच्या गावावरून जाणाऱ्या या पालखीच्या दर्शनावरच तृप्त रहावयाचें । हा प्रघात आज कित्येक वर्षे चालू आहे

विठ्ठलराव घाटे याच्या अभंगात तुम्हाला आजकाल सभोंवतीं घडत असलेल्या गोष्टींची छाया पडलेली दिसेल जातींवरून, पक्षांवरून देशात भांडणें चाललीं आहेत, सर्व जाती एक करणारा वारकरीपंथ काढणाऱ्या संतांची आठवण महाराष्ट्र विसरला आहे, देवाचे देवळात राहण्याचे दिवस संपले असून महाराष्ट्रात एकी करण्यासाठीं त्यानें बाहेर यावें ही विनंति किती सूचक आहे !

शिकलेल्या लोकाना धर्म हें एक थोताड आहे असें वाटतें, देवापुढें मस्तक नम विण्याची, फार काय देवाचें नांव घेण्याचीहि कित्येकाना लाज वाटते ही दिलेली कबुली व ही स्थिति बदलण्यासाठी केलेली देवाची आळवणी कवीची मन स्थिति दाखविते.

**६४ भाताच्या मळ्यांत** प्रसिद्ध लघुकथालेखक विष्णु सखाराम खांडेकर याची ही कविता भूपति-वैभव या जुन्या चालींत रचली असून, त्यात अनेक प्रकारांचें मिश्रण झालेलें आढळेल कोंकणांतील भाताचीं खाचरें, त्यात इरली घालून गुडघा भर पाण्यात खपणारे जीव, वाऱ्याच्या झुळकेनें सळसळणारें भात, शेतातून दूरवर जाणारें तें तारायंत्राचे खांब, व लोंबत्या तारेंतून निघणारे आवाज, तारेवर बसणारें, शीळ घालणारें पाखरू यांचें साधें पण रम्य चित्र आगगाडींतून प्रवास करताना कर्जत, नेरळ या भागात किंवा मध्यप्रांतातील भंडारा, गोंदिया या भागात पुष्कळांनीं पाहिलें असेल इतर ठिकाणीं सुद्धा हें दृश्य दिसेल पण कवीचा हेतु नुसतें वर्णन करण्याचा नसून, त्यानें कौशल्यानें दोन' विचार वाचकांपुढें मांडले आहेत

भाताच्या मळ्यांतलें, वायूचें व जलदेवीचें संगीत हृदयाला रुचतें. बुद्धीला तें निरर्थक वाटून तारायंत्राच्या तारांतून आलेले रम्य विविध संदेश आवडतात. कवि आपली वर्णन करून सांगतो की चिमुकलें पांखरूं तारेवर बसून शीळ घालत आहे. आता कवीचा सूचक प्रश्न पहा. भाताच्या मळ्यातील संगीतानें मोहून पक्षी गाऊं लागला, का बुद्धीला समजणाऱ्या संदेशामुळें तो गाऊं लागला ? आणि नंतर कवीचा आशय असा की नैसर्गिक वस्तूंनीं मनुष्यानें मोहून जावें किंवा बुद्धिगम्य संदेशांनीं आनंद मानावा ? उत्तर थोड्यांत्हून यावें अशी वरवर अपेक्षा असली तरी कवीनें कल्पनाच्या माडणींत व 'पाश' हा शब्द वापरून स्वतःचें उत्तर सदिग्ध व मूक तऱ्हेनें दिलेलें आहे. खाडेकराच्या गद्य-लेखनाप्रमाणें कवितेंतहि त्याच्या बुद्धीची व कल्पकतेची चमक दिसून येते.

६५ **पाटील.** गणेश हरी पाटील यांनी स्वतःच पाटिलावर कविता लिहावी यात किती गमत आहे ? 'मीहि याच वंशातील होतें माडवडिल पाटिल, म्हणून या जीवाची तळमळ' असें कवि म्हणतो

कवितेंतील पाटिलांची जुन्या धर्त्याची रहाणी बदलल्या काळात मुळीं नाहीं त्याची पूर्वीची दिनचर्या, रुबाब व दरारा अजून कायम आहे. पण या नावाच्या पाटिलास पत्र वाचून पेण्यास कुळकर्ण्यांच्या तोंडाकडे पहावें लागतें, अधिकाऱ्यांची मर्जी समाळावी लागते, ही वाईट स्थिति पाहून कवीस वाईट वाटतें. एक उत्तम चित्र व सद्यःस्थितीचें प्रतिबिंब यामुळें कविता चागली वाटते.

६६. **खेड्यांतील हृदय.** महाराष्ट्र-रसवंती, भाग १ ला, यानील *खेड्यातील आनंद, वस्ती व कृषीवलगीतें आणि सृष्टिवर्णनें*, यात खेड्यातील देखावे, लोकांची रहाणी याविषयींच्या काव्यकल्पना तुम्हीं वाचल्या आहेत. या कवितेंत तुम्हाला शरद्, हेमत, चैत्र व ग्रीष्म ऋतूत एकाच खेड्यातील देखाव्यांत फरक कमसा पडतो याचें वर्णन केलेलें आढळेल गिरीश कवीच्या 'आंबराई' या खडकाव्यातील हीं वर्णनें येथें एकत्रित केलीं आहेत कल्पनेपेक्षा यथातथ्य वर्णना-वरच कवीनें यात जास्त भर दिला आहे

६७ **गालगोट.** प्रो विष्णु भिकाजी कोलते हे *वऱ्हाडातील विद्यमान कवींपैकीं* एक उच्च दर्जाचे कवि आहेत. याची कविता विविध प्रकारची असून, काहीं कविता ग्राम्यप्रचुर तर काहीं प्रांतीय बोलीनें नटलेल्या आहेत स्वभावोक्ति हा त्यांचा

आवडता अलंकार असून, ग्रामीण भाषेतील त्यांचीं वत्सलरसाचीं गीतें उत्कृष्ट आहेत

या गीतासंबंधीं चालू पिढींतील एक विद्वान् व चोखंदळ टीकाकार ग. त्र्य. माडखोलकर हे, 'रूढ मराठी भाषेच्या सौंदर्यास डाग लागू न देतां, स्थानिक बोलींतील शब्द कसे वापरावे याचा उत्कृष्ट नमुना' असे याविषयीं उद्गार काढतात. कवि व काव्यचर्चिक प्रो माधवराव पटवर्धन यांनीं 'प्रादेशिक बोलींतील शब्द मराठींत प्रचलित करण्याचा प्रयत्न,' असा त्याविषयीं अभिप्राय व्यक्त केला आहे

**६८. अज्ञात नाथास** माधव ज्यूलियन् यांचा फार्शी भाषेचा व्यासंग दांडगा आहे, त्यांनीं 'फार्शी-मराठी कोश' नावाचा कोश रचिला आहे जुनीं ऐतिहासिक कागदपत्रें, बखरी किंवा पेशवाईंतील शाहीरांचे पोवाडे किंवा लावण्या वाचतांना हा कोश घडोघडीं वापरावा लागतो मराठी कवितेंत गझल काव्यप्रकाराचा जोरानें पुरस्कार करून, तो चिरस्थायी करण्यास त्यांचेच श्रम कारणीभूत आहेत या प्रकाराचें नियतकालिकांतून व 'छंदोरचना' या आपल्या ग्रंथात त्यांनीं सोपपत्तिक विवेचन केलें, इतकेंच नव्हे तर त्याप्रमाणें स्वतंत्र गझल लिहून 'गझलांजलि' या नावाचा गझलसंग्रह प्रसिद्धहि केला

गझल हा मूळ अरबी पद्यप्रकार उर्दू पद्याच्या परिचयामुळें मराठींत प्रथम आला. अज्ञात नाथास, हा गझल षण्मात्रिक असून, प्रत्येक ओळीचें लेखन ( ——— ।—˘———।———˘।—— ˘——— ) असें आहे गझल ही अरबी वृत्तांतील एक-यमकी रचना आहे त्यामुळें परस्परांशीं संबंध नसलेल्या द्विपद्या लिहिण्याची पूर्वीची पद्धत असे या गझलामध्ये एकसूत्रीपणा आणून उपांत्य पूर्वक यमक ( प्राणयमक ) सर्व ठिकाणीं योजिलेलें सापडेल गझलांतून फक्त प्रणयभावनाच व्यक्त केलेल्या असतात, अन्य भावना व्यक्त करावयाला तो फारसा सोईचा नाहीं, अशी सार्वत्रिक समजूत आहे पण तशी वस्तुस्थिति नाहीं नीति किंवा वैराग्य हेहि विषय गझलांतून परिणामकारक रीतीनें मांडता येतात प्रस्तुत गझल हें त्याचें उदाहरण होय अज्ञात अशा परमेश्वराच्या शोधार्थ विव्हळ झालेल्या भक्ताची आर्त वाणी यांत उत्तम तऱ्हेनें व्यक्त झाली आहे

**६९. मातृभोजन.** कवि यशवंत यांनीं मुलाविषयीं लिहिलेल्या अनेक कविता प्रसिद्ध आहेत मातेच्या वियोगामुळें उत्पन्न झालेली व्याकुलता दर्शविणारी 'आई'

भाताच्या मळ्यांनलें, वायूचें व जलदेवीचें संगीत हृदयाला रुचतें बुद्धीला तें निरर्थक वाटून तारायंत्राच्या तारांतून आलेले रम्य विविध संदेश आवडतात कवि आणखी वर्णन करून सांगतो की चिमुकलें पांखरूं तारेवर बसून शीळ घालत आहे आतां कवीचा सूचक प्रश्न पहा भाताच्या मळ्यानाल संगीतानें मोहून पक्षी गाऊं लागला, का बुद्धीला समजणाऱ्या संदेशामुळें तो गाऊं लागला ? आणि नंतर कवीचा आशय असा की नैसर्गिक वस्तूंनीं मनुष्यानें मोहून जावें किंवा बुद्धिगम्य संदेशांनीं आनंद मानावा ? उत्तर श्रोत्याकडून यावें अशी वरवर अपेक्षा असली तरी कवीनं कल्पनाच्या मांडणींत व 'पाश' हा शब्द वापरून स्वतःचें उत्तर संदिग्ध व मूक तऱ्हेनें दिलेलें आहे खाडेकराच्या गद्य लेखनाप्रमाणें कवितेंतहि त्यांच्या बुद्धीची व कल्पकतेची चमक दिसून येते

६५ **पाटील** गणेश हरी पाटील यानीं स्वत च पाटिलावर कविता लिहावी यांत किती गमत आहे ? 'मीहि याच वंशातील होतें वाडवडिल पाटिल, म्हणून या जीवाची तळमळ' असें कवि म्हणतो

कवितेंतील पाटिलाची जुन्या वळणाची रहाणी बदलत्या काळात मुळीच नाहीं त्याची पूर्वीची दिनचर्या, रुबाब व दरारा अजून कायम आहे पण या नावाच्या पाटिलास पत्र वाचून घेण्यास कुळकर्ण्यांच्या तोंडाकडे पहावें लागतें, अधिकाऱ्याची मर्जी सभाळावी लागते, ही वाईट स्थिति पाहून कवीस वाईट वाटते एक उत्तम चित्र व सद्य स्थितीचें प्रतिबिंब यामुळें कविता चांगली वाटते

६६ **खेड्यातील दृश्य** महाराष्ट्र-रसवंती, भाग १ ला, यातील खेड्यांतील आनंद, वस्ती व कृषीवलगीतें आणि सृष्टिवर्णनें, यात खेड्यांतील देखावे, लोकांचा रहाणी याविषयींच्या काव्यकल्पना तुम्हीं वाचल्या आहेत या कवितेंत तुम्हाला शरद्, हेमंत, चैत्र व ग्रीष्म ऋतूत एकाच खेड्यातील देखाव्यात फरक कसकसा पडतो याचं वर्णन केलेलें आढळेल गिरीश कवीच्या 'आबराई' या खंडकाव्यातील हीं वर्णनें येथें एकत्रित केलीं आहेत कल्पनेपेक्षा यथातथ्य वर्णना वरच कवीनें यात जास्त भर दिला आहे

६७ **गालबोट** प्रो विष्णु भिकाजी कोलते हे वऱ्हाडातील विद्यमान कवींपैकीं एक उच्च दर्जाचे कवि आहेत याची कविता विविध प्रकारची असून, काहीं कविता संस्कृतप्रचुर तर काहीं प्रांतीय बोलीनें नटलेल्या आहेत स्वभावोक्ति हा त्यांचा

आवडता अलंकार असून, ग्रामीण भाषेतील त्याचीं वत्सलरसाचीं गीतें उत्कृष्ट आहेत

या गीतासंबंधीं चालू पिढींतील एक विद्वान् व चोखदळ टीकाकार ग. त्र्यं. माडखोलकर हे, 'हट्ट मराठी भाषेच्या सौंदर्यास ढळ लागू न देता, स्थानिक बोलींतील शब्द कसे वापरावे याचा उत्कृष्ट नमुना' असे याविषयीं उद्गार काढतात. कवि व काव्यचर्चिक प्रो माधवराव पटवर्धन यांनीं 'प्रादेशिक बोलींतील शब्द मराठींत प्रचलित करण्याचा प्रयत्न,' असा त्याविषयीं अभिप्राय व्यक्त केला आहे

**६८. अज्ञात नायास** माधव ज्यूलियन् यांचा फारशी भाषेचा व्यासंग दांडगा आहे, त्यांनीं 'फार्शी-मराठी कोश' नावाचा कोश रचिला आहे. जुनीं ऐतिहासिक कागदपत्रें, बखरी किंवा पेशवाईतील शाहीराचे पोवाडे किंवा लावण्या वाचताना हा कोश घडोघडीं वापरावा लागतो मराठी कवितेंत गझल काव्यप्रकाराचा जोरानें पुरस्कार करून, तो चिरस्थायी करण्यास त्यांचेच श्रम कारणीभूत आहेत या प्रकारांचें नियतकालिकातून व 'छंदोरचना' या आपल्या ग्रंथात त्यांनीं सोपपत्तिक विवेचन केलें, इतकेंच नव्हे तर त्याप्रमाणें स्वतंत्र गझल लिहून 'गझलांजलि' या नावाचा गझलसंग्रह प्रसिद्धहि केला

गझल हा मूळ अरबी पद्यप्रकार उर्दू पद्याच्या परिचयामुळें मराठींत प्रथम आला अज्ञात नायास, हा गझल षण्मात्रिक असून, प्रत्येक ओळीच लेखन ( —— ।—∪———।———∪।—— ——— ) असें आहे गझल ही अरबी वृत्तातील एकयमकी रचना आहे त्यामुळें परस्पराशीं संबंध नसलेल्या द्विपद्या लिहिण्याची पूर्वीची पद्धत असे या गझलामध्ये एकसूत्रीपणा आणून उपांत्य पूर्वक यमक ( प्राणयमक ) सर्व ठिकाणीं योजिलेलें सापडेल गझलांतून फक्त प्रणयभावनाच व्यक्त केलेल्या असतात, अन्य भावना व्यक्त करावयाला तो फारसा सोईचा नाहीं, अशी सार्वत्रिक समजूत आहे पण तशी वस्तुस्थिति नाहीं नीति किंवा वैराग्य हेहि विषय गझलातून परिणामकारक रीतीनें मांडता येतात प्रस्तुत गझल हें त्याचें उदाहरण होय अज्ञात अशा परमेश्वराच्या शोधार्थ विव्हळ झालेल्या भक्ताची आर्त वाणी यात उत्तम तऱ्हेनें व्यक्त झाली आहे

**६९. मातृभोजन.** कवि यशवंत यांनीं मुलाविषयीं लिहिलेल्या अनेक कविता प्रसिद्ध आहेत मातेच्या वियोगामुळें उत्पन्न झालेली व्याकुळता दर्शविणारी 'आई'

ही त्यांची कविता तुम्ही यापूर्वी वाचली किंवा ऐकली असेलच आता, आईला आपल्या मुलाबद्दल वाटणारें प्रेम व्यक्त करणारी ही कविता पहा मुलाच्या मृत्यूनें आईला तीव्रतर दुःख होतें हें खरेंच, पण आयुष्यात असे अनेक प्रसंग येतात, कीं ते आनंदाचे प्रसंग असूनहि दुःखाच्या छटा त्यात बऱ्याच प्रमाणात मिश्रित झालेल्या आढळतात

मुलाचें मौंजीबंधन झाल्यावर मुलानें आईच उष्टें खावयाचें नाहीं अशी रूढी आहे. त्यामुळें मायलेंकरूं एकत्र बसून जेवण्याचा, आईच्या हातानें मुखात घास घातला जाण्याचा हा शेवटचाच प्रसंग लेंकराला स्वहस्तें भरविण्याचें सुख आता मिळावयाचें नाहीं म्हणून आईला एका बाजूनें वाईट वाटतें, तर शैशव संपून मुलाचे विद्यार्जनाचे, नावलौकिक मिळविण्याचे दिवस सुरु झाले म्हणून तिला आनंदहि होतो आणि ती, "उच जाई, होई बाळा, गुण शील विद्यावंत, ध्वज होऊ दे दिगंत" असा आशीर्वाद देते. पण पुन्हा कंठ सद्गदित होऊन, "परि याव रीं राजसा, माझ्या अंकीं जरा बैस, भरवू दे तुला घास," असें म्हणू लागते. अशा या मिश्र भावनाचें मोहक चित्र कवीनें यात मोठ्या मार्मिकतेनें रेखाटलें आहे. यात, प्रसंग, त्याची मांडणी व विचारसरणी यांची योजना कवीनें अतिशय कुशलतेनें केली आहे

५०. **प्रार्थना** प्रत्येक भक्त आपल्या आराध्यदेवतेची प्रार्थना करतो व तींत आपले सर्व भाव व्यक्त करण्याचा प्रयत्न करतो धर्मसंस्थापक किंवा धर्मप्रचारक याना त्यांच्या कार्याचा प्रसार करीत असता अनेक दिव्यातून पार पडावें लागतें त्या प्रसंगीं त्यांच्या मुखातून जे उद्गार बाहेर पडतात, त्यात भावनोत्कटता व जिवंतपणा हे गुण स्वाभाविकच उत्कर्षास पावलेले असतात आयुष्यभर हृदयाशीं बाळगिलेल्या ध्येयाचें व तत्त्वाचें प्रतिबिंब त्यांत अभावितपणें पडलेलें असतें त्यात भाषेचें अवडंबर नसतें त्यातील भावना उत्कट असतात त्यामुळें या प्रार्थना हृदयस्पर्शी होतात येथें उद्धृत केलेल्या प्रार्थना गो ग तळवलकरकृत 'आशियाचा धर्मदीप' यातून निवडलेल्या आहेत

## ५७ एक अमेरिकन मुलगी

पाठीवरी रुळति धूसर मुक्त वाल, जैसे गुलाब फुलले दिसतात गाल,
विस्तीर्ण हे निढळ पाणच केवड्याचें, तेथें सुभाग्य मतिमन्त खुशाल नाचे १

ह्या केवड्यावर अली बसले मधून, तैसेचि हे कुरळ शोभति दोन तीन
ह्या रम्य वक्र भिवया म्हणतात 'येथें, थारा, नसे कृपण दीन मनोरथांतें !' २
सारे प्रसन्न मधु बाल्य करी विहार, नेत्रांत जें करि तयांप्रति लोल फार
रम्या तुझे हरपलें जणुं सर्व पाणी, ही रम्य दीर्घ नयनें गमतें बघोनी ! ३
हें रत्न सुंदर दिसे मज चारुतेचें, सारल्य अग्रनतिमान अपूर्व ज्याचें,
सोत्कंठ नासिक हिचें म्हणतें जगाला, आर्यान्वयोद्भव खरोखर रम्य बाला ४
किंचित् प्रभातसमयीं कलिनें फुलावें, कीं अंतरंग लपवून पुढें करावें,
हें हासरें मुख हिचें करि तीच लीला, दावी पुन्हां लपविते रदनावलीला ! ५
आरक्त ओष्ठ जणुं वेलच पोवळ्याचे, तेही गमे विरमतील पुढें तयाचे;
किंचित् विभक्त दिसती जणुं सांगताती, निश्चिंत निर्मल सुखी किती बालवृत्ति ६
वाटे उषाच हंसते फिरते जगांत ! कीं स्फूर्ति हीच कविची मधुरूप घेत !
अव्याजता रसिकता जणुं मूल झाली ! स्वर्गांतुनी सहज भूवर आज आली ! ७

नारायण वामन टिळक

## ५८ होनाजी बाळ

" घनश्याम सुंदरा, श्रीधरा ! अरुणोदय झाला
उठिं उठिं बा वनमाली ! उदयाचलीं मित्र आला. "
रोज उगवतो, मावळतोही फरक जीवनीं काय ?
वीरत्वाचें कवन कशाचें ? रडणें नशिबीं धाय ! १
तीच चाकरी, तीच भाकरी, तीच शृंखला पायीं
कशी स्फुरावी प्रतिमा-ज्योती ! जीवन निजला नाहीं ? २
घरांत बसुनी रडे कोंबडा, वा मंडुक कूपांत
वीरश्रीच्या वृथा कल्पना खुलतिल का काव्यांत ! ३
शेंदाडांची मर्दुमकी नित चुलीजवळ ती चाले
समशेरीची लखलख कुठली, वा बोथाटी, भाले ! ४
अबलावरतीं शौर्य गाजवूं, करूं गर्जना भारी
स्वप्नीं ना परि ऐकूं येई कोणाला रणभेरी ५
तुझ्यासारखे बोल कोठुनी कवि होनाजी बाळा !'
स्फुरतिल आतां मम हृदयीं जरि उदयाचलि रवि आला ! ६

दसात नव्हती भक्ताची या वस्त्राची कोणाला
सृष्टिसुंदरीसवें खेळण्या मोद होय हृदयाला ७

तुच्छ जगाला धीर हेरिला धरुनि कास सत्याची
जीव वेंचणें धर्मापायीं, पूर्ती ही आशेची ! ८

सूर्य उगवतां वाटे त्यांना प्रीतीचा, सत्याचा
स्वातंत्र्याचा स्वामी जगतीं, मारक अंधाराचा ९

सूर्य उगवतां जीवन घाली मृत बनल्या सृष्टींत
म्हणुनि दर्शनें पुलकित होती वृत्ति एक निमिषांत १०

सृष्टी रंगे, मोदें नाचे विश्व सकल पाहून
कविची प्रतिभा स्फुरते, गाते गाणीं आनंदून ११

भ्रांत पडे अजि पोटाची या कवि होनाजी बाळा !
सृष्टिगीत मी गाउं कसें जरि उदयाचलिं रवि आला ! १२

निधे मराठा काढुनि छाती वारूवर डौलानें
समशेरीला सखी मानिली, कट्यार कन्या त्यानें १३

रंग केशरी जोहाराचा, शिरीं दुपेटा झळके
हृदय फाकडें ऐटी, परि तें स्वदेशकार्यीं वांके १४

महाराष्ट्र हा देश आमुचा रोमांगीं हें भरलें
तेच निघाले बोल मुखातुनि कृतिचे प्रेरक झाले १५

स्वातंत्र्याचीं फुलें वाहाण्या मायभूमिच्या पायीं
वीर मराठे वागडती ते तेव्हां ठायीं ठायीं १६

वीररसाचीं गाणीं गाशी कवि होनाजी बाळा !
गाउं कसे मी पोवाडे जरि उदयाचलिं रवि आला ! १७

ना. के. बेहेरे

## ५९ पहा हो कसा हा कारागीर !

( भैरवी–ताल दादरा )

पहा हो कसा हा कारागीर !
थरारली तनू झरे नयनीं नीर
कातरणही पानें पानें रम्य झालरी परी !
तरी करांतरीं कुठें नाहिं कातरी !–पहा हो० १
फुलां–फुलांमध्यें कसा छटा सुरम्य रंगल्या
इंद्रचापिं रंग हे ! करिं न कुंचल्या !–पहा हो० २
मखमाली फुलपांखरुं सुबक हें पहा कुणी !
बुटवा पहा परांवरी ! करिं न लेखनी !–पहा हो० ३
अगाध नीलिमा वरी, रम्य गोल त्या वरी
सुनेरी रुपेरी हे टीक हि न करीं !–पहा हो० ४
काळी ही चंद्रकळा रात्र ल्यालि; ती वरी
कशीदा रुपेरी हा ! सुइ कुठें करीं ?–पहा हो० ५
रजनीचा पट भरजरी भानुच्या गवाक्षि तो
अभ्रांतरीं अयंत्रची किती चकाकतो !–पहा हो० ६
त्यजत्र मान मानवा ! वृथाभिमान सांडुनी !
अनंत रम्यता पहा ! लाज रे मनीं
पहा हो कसा हा कारागीर
थरारली तनू झरे नयनीं नीर

भा. रा. तांबे

## ६० घनाभिनंदन

( शिखरिणी )

अहो आला आला ! नवजलद हा अंबरपथीं,
बसोनी वायूच्या अतिचपल–वेगोद्धत रथीं,
पहा ! नानारंगी निकट धनु त्याचें विलसतें,
विजेची ती दोरी फिरफिरुनी झंकार करिते. १

महानादें त्याच्या सकलहि नभोमंडल कमें
क्षणार्धानी गेलें, झडुनि रणवाद्यें रण जसें,
उठे झंझावातें अपरिमित धूळी दशदिशा,
तयानें त्या जैसा दिपति करिणी कोपविवशा. २

खळा दुष्काळाशीं करुनि घनघोराजि, घन हा
तया संहारूं ये जणुं जमवुनी सैन्य-निवहा,
क्षणामाजीं त्यानें उदयगिरि काबीज करुनी,
नभोमध्य-प्रांतीं गडगड दिली कीं उडवुनी ! ३

समुद्रापेशी ही तुमल चमु त्याची चहुंकडे
किती वेगें व्यापी गगन, रवही ठेवि नुघडे,
प्रचंडा मार्तंडाप्रतिहि सहसा घेरुनि बळें
तिनें त्याचें केलें हरण बहुधा तेज सगळें. ४

घनच्छायायोगें कितितरि चमत्कार घडला
पहा ! कीं सृष्टीचा अवचित जणों नूर फिरला,
पदार्थांची कांती नयनसुभग श्यामल दिसे,
तयांमध्ये काहीं नवलपरिचा हर्ष विलसे ! ५

विझोनियां आहे प्रगर खदिरांगारसम ते,
किती आतां वातावरण तनुला हें सुखविते !
जणों कीं वायूला जलदगुरुनें आज अपुली
जगाच्या तापातें शमन करु दीक्षाच दिधली ६

घनाच्या ध्यानानें जग निजपणातें विसरलें,
म्हणोनी तें भासे जलधरसम श्याम बनलें,
निवाराया आला जलद निज संताप म्हणुनी
उडोनी ग्लानी ये सहजचि नवोत्साह भुवनीं. ७

दयासिंधो मेघा ! अघटित तुझा होय महिमा,
नसे ठावा त्याचा कुठुनि वदवे तो मग अम्हा ?
तुझ्या छायामात्रें घडति जरि ह्या अद्भुत कृती,
तरी वृष्टि होतां कृति मग घडेना कवण ती ! ८

ा पाहे जरि तव महौदार्य तरि, तो
पती भूगोलाचा कृपणहि दरिद्रीच दिसतो;
तुझ्या श्रीमंतीचा किमपि मिळतां अंश नृपती
जगामध्यें श्रीमान् म्हणुनि बहु डोलें मिरवती ! ९

धनाची धान्याची अवनिवरि होणें विपुलता,
तसें सर्वांभूतीं कुशलहि निजोद्योगवशता,
मनःशांती, राष्ट्रोन्नति, सुख, समाधानहि जनीं,
कृपेचीं हीं तुझ्या विलसति फलें भव्य भुवनीं. १०

बहु कां बोलावें ? सकलहि जगज्जीवन-घना !
तुझ्या आधीनत्वें खचित असतें विश्वशरणा !
जगज्जेता, तोही जरि तव कृपापांग न मिळे,
तरी दीना मीनासमचि निरुपायें तळमळे ! ११

चंद्रशेखर

## ६१ प्रबोधन

उघडिं नयन ! रम्य उषा हंसत हंसत आली !
अरुणकिरणमय वसना अवनी ही ल्याली ॥ ध्रु० ॥

मंजु मधुर गान करित
आनंदें भुवन भरित,
विहगवृंद गगनिं उडत
या सुरम्य कालीं !
उघडि नयन रम्य उषा हंसत हंसत आली !

हंसति फुलें, तरु झुलती,
लतिकागण नृत्य करिति,
धांवति या भ्रमरतती
सुसि तुला आली !
उघडिं नयन रम्य उषा हंसत हंसत आली !

सुप्रभात सुखकर हा
दारुण तिमिरोत्कर हा
रमवी मरूतांस पहा
दिव्य रिमवशाली !
उघडि नयन रम्य उषा हसत हसत आली !

रेंदाळकर

## ६२ कुमारी पिरोजा



सुशुभ्र पाटीवरती लोंबे
सैल तिपेडी वेणी धूम्रर,
लाल फितीच्या आगवळाची
गाठ रुंद किति चमके सुंदर !

तलम मल्मली तगरशुभ्र तो
    संग झगा आजानु तनूवर,
उदार अपुला त्यांतुनि दावी
    गींडस बांधा प्रमाणसुंदर. २

दिसे कसा सुकुमार उंच हा !
    हालचाल रमणीय पहा कीं—
पवनें लवुनिहि सरूतरू जणुं
    ऊर्ध्वसरलगति संतत राखी. ३

तुरळक तुरळक झग्यास झालर,
    ती साधेपण अधिकचि खुलवी;
श्रीमंतीचें हें साधेपण
    सद्‌भिरचीला कॅवि न झुलवी ! ४

काळ्या जाळीच्या मोजांतुनि
    विलसति हिमसित जंघा सुंदर,
येतां मौक्तिक–धवल मत्स्य ते
    जसे गहन चलिं जवळ जवळ वर. ५

उंच निमुळत्या टाचेचे ते
    बूट घालुनी शाद्वलभूवर
डौलानें किति फेऱ्या घेते
    गिरेबाज गुल्छबू कबूतर ! ६

फिरत गुणगुणे चाल विदेशी
नाचवील ती जिवास ऐशी
    किती हळू या सुरेल ताना !
    वाटे येती कान फुलांना ७

गुलाब टवटवले उद्यानीं
त्यांत विराजे ही फुलराणी
    जाय हळू फुलझाडाजवळीं,
    फुलांस हुंगी, चुंबी, कवळी ८

अहा परी हे निर्भय डोळे
किति विश्वासी साधे भोळे !
स्मर येथें नसे प्राणहर
विद्ध जरी हो मृदु रसिकांतर.

* * *

खेळकरपण मुक्त मनाचें
चमके नयनीं, विहरे वदनीं
मोकळिकीच्या आनंदाचें
लास्य विशद हें मौक्तिकरदनीं

माधव ज्यूलियन्

## ६३ आळंदीची पालखी

अभंग

१

राया रखमाईच्या वरा    आतां करा बापा ! त्वरा
"ज्ञानदेव तुकाराम !"    "ज्ञानदेव तुकाराम !"
चोहोंकडे एक घोष    तेणें कोंदलें आकाश
टाळ झांज व मृदंग    भजनाचा एकच रंग
झाली पताकांची दाटी    जाया विठ्ठलाच्या भेटी
सोडा, सोडा काम-कांना    आनंदाच्या आल्या फौजा
ज्ञानोबाचा आला घोडा    आता या रे दारें उघडा
घ्या रे फूल आणि पान    करा संतांना अर्पण
खुली पेठ वैकुंठींची    तुम्हा आम्हा दैना कैची
झाला मिरास पंढरी    तुम्ही आम्ही वारकरी
तुम्ही आम्ही भाऊ भाऊ    चला पंढरीला जाऊ

२

विसरलों तुझ्या पाया    आम्ही पंढरीच्या राया
ज्ञानोबाची, तुकोबाची,    नामयाची, चोखोबाची

शिकवण या संतांची देवा विसरलों साची;
कळाकुसरी पांडित्याची परि आमचीं मर्की कधीं
वाघिणीचें दूध प्यालों भोळ्या भावा दुणावलों
ज्ञात झाली अमुचा देव पश झाला अमुचा देव
यांच्यासाठीं संवरणें, यांच्यासाठीं हीं भांडणें
वृथा कर्म, वृथा ज्ञान नाहीं तुमचें अधिष्ठान
नाना यातींचा गलबला वाळवंटीं शांतविला
आज वेळ तीच आली, ये ग विठाई माउली

३

नका राहूं राउळांत या हो देवा महाराष्ट्रांत
सोडा पंढरीनगरी करा महाराष्ट्राची वारी
वाळवंटींचा सोहळा महाराष्ट्रीं देवा खेळा
एका पुंडलिकासाठीं येणें केलें जगजेठी
एका जनीईकारणें केलें दळणें, कांडणें
उद्धरिला अजामिळ नाहीं केला देवा वेळ
महाराष्ट्राचा कळवळा कां न आला हो दयाळा
ज्ञानोबाची जन्मभूमी नामयाची गानभूमी
तुकोबाची भावभूमी शिवबाची कर्मभूमी
पुण्यभूमी पुण्यभूमी करा पुन्हां धर्मभूमी

४

अगा पंढरीच्या देवा जरा ऐका माझा धावा
जें जें मनाला वाटलें तें तें वाचे उच्चारिलें
शेवटची एक अर्जी आतां ऐका हो देवाजी
नाम तुमचें ध्याया मुखा लाज वाटूं देऊं नका
व्याप नित्याचे सोडावे सुखदुःखातीत व्हावें
आणि एकांतांत जावें सुंदर तें ध्यान ध्यावें
नित्य होऊनीया दंग गावे नाम्याचे अभंग
नाना फुलें जीवनाचीं गुंफा तुमच्या सूत्रीं साचीं

हेची दान आतां घावें आळवितों जीवेंभावें
आण तुम्हां तुकोबाची, धून करा विठ्ठलाची

विठ्ठलराव घाटे

## ६४ भाताच्या मळ्यांत



डुलु मला झुळझुळे सळसळत्या भातानें
जणुं झराच अवखळ शिरवत जललहरीनें !
चहुकडे हासतो चिमणा सागर हिरवा
कुणी म्हणेल इरलीं–फिरती हुवल्या नावा

किती उदार सागर लपवि न कधिंही मोतीं
नवतुरे तरगति लाटीं, भवतीं वरतीं

मृदु संगीताचे येति मधुनि मधु सूर
जलदेवींचें जणु गान, लावि हुरहूर !

दे पार्श्वभूमि, जरि भिन्न, रम्यता चित्रा
या उभारिलें का म्हणुनी तारायंत्रा ?
हे स्तंभ उच्च नच–विचरें गाति निशाणें ?
"का कळेल हृदया, बुद्धि सहज जें जाणे ?

मृदु झुलती भातें, वाजवि वायु सनार
परि गीत निरर्थक धरणीलागी भार.
या तारा अमुच्या–पारा! बांधिले देश
आणितों क्षणोक्षणिं विविध रम्य संदेश!"

ये रमत पांखरूं एक–चिमकुलें
तारांवरि झाडुनि पंख–बैसलें
हलु शीळ घालितें मंजुळ रंगुनि नादीं
संदेश ऐकुनि कीं तीं गाणीं साधीं?

वि. स. खांडेकर

## ६५ पाटील

[ जाति–केशवकरणी ]

अवलख वारूवरी बैसुनी येतो हा पाटिल
शिरीं भरजरी झुले मंदिल
मंदीलाची कड जरतारी किंचित् मानेवर—
झुकूनी झुलते वरचेवर
गंधटिळा भाळावर, झुलती कानामधिं चौकडे
मिशांचे गालांवर आकडे
लाल झांक डोळ्यांत जराशी, हुकमी तोन्यावर
बोलतो काढुन करडा स्वर
रमत रमत वेशींत गांवच्या शिरतो मग पाटिल
मंडळी चपापती तेथिल
'जी जी' करिती मुजरे, हुजरे सदरे जणुं वेस्कर
खालतीं लववुनि अपुलें शिर
खबरबात गांवची विचारत चावडींत पाटिल



हुकुम घ्यावया खडे जाहले रामोशी, वेस्कर
पुढें करिं कुळकरणी दप्तर

* * *

चित्र जुनें गावच्या धन्याचें दिसलें डोळ्यापुढें
आज परि काय दृष्टिला पडे ?

या अमदानींत उरले असती नांवाचे पाटिल
स्वतांची त्या जाणिव कोठिल ?
पिढ्यापिढ्यांतिल बदल असे हा, दोष नसे त्यांकडे
हीच दुरवस्था चोहींकडे
सरकारी अधिकारी यांची मर्जी सांभाळुन
कसेतरि घालविती ते दिन !
"काळाचा हा ओघ ओळखा व्हा पाटिल शहाणे
नका करूं हीन आपुलें जिणें
व्हा साक्षर, अधिकारक्षम मग तेच तुम्ही व्हाल कीं
नवी दाखवाल पाटीलकी
मीहि याच वंशांतिल, होते वाडवडिल पाटिल
म्हणुन या जीवाची तळमळ"

गणेश हरी पाटील

## ६६ खेड्यांतील दृश्यें



'हा! हा! हा! हा! बहिन्या! बहिन्या! शब्द ये
भिंगू भिंगू गोफणगोटा जातां भुर्कन पक्षि उडाले
'भी भी' असली थंडी म्हणतां फुटले सारे ओठ
गाण्यासंगें तरी चालली धावेवरती मोट
गहू, हरभरा, शाळू, खपला आतां बहरा आले
शेतकन्यांचे डोळे त्यावर फिरतां पूर्ण निवाले.

*

हेमंताच्या ऐन थंडिचा कडका पडला रानीं
आंबराईचीं काळवंडलीं झाडें पानीं पानीं
शिवारांतल्या जोंधळ्यावरी किरण रवीचे पडले
आणि तयांनीं नव मोत्यांचें लेणें रानीं घडलें
निळा पांढरा मधेंच कोठें निघे पिकांतुन धूर
सांगे 'तरणी पोरें झालीं हुरड्यामाजीं चूर'
असल्या एका रम्य सकाळीं, संगें घेउनि सगळीं
हुरडा खाया मळ्यांत आई, कोणाल्हाहि न वगळी
ऊस, हरभरा, शेंगा, केळीं आणि कोवळे दाणे
रानदेविनीं दिलें तयांना हेमंताचें खाणें.

*

चैत्रपालवी डवरून गेली तरुवर ठायीं ठायीं
आम्रफळांनीं वेढूमधली भरली राई राई
थांधावरच्या रानगुलाबावरी कळे मोहरले
सुगंध भरिती हवेंत वारे मोगरवेलींवरले
फांदीफांदीमधुनी गाई गीत कोकिळा गोड
मंद सुरांनीं ओहळ त्याला देई अपुली जोड
पाण्यावरलीं हिरवळलेलीं पिकें डोलती रानीं
तिर्थंच घुमलीं शेतकन्यांचीं गाणीं मधुर सुरांनीं
सृष्टिसुंदरी देऊं लागे नित्याचे निज पाठ
आनंदानें दंग जाहला सारा कृष्णाकांठ

*

थंडी जाउन, आतां उष्मा वाढूं लागे थोडा
शिशिरामधला सळसळणारा बारिक झाला ओढा

परि थंडींतिल चराचराची लोपुन भीषण छाया
पानोपानीं मोहक विलसे नव वासंतिक माया

कुठें कोंवळे पल्लव फुटले कोठें मोहर आला
वाऱ्यामधुनी सुगंध लागे रानीं दरवळण्याला

सुंदर मंजुळ पक्षिरवांनीं भरली अंबेराई
गीत कुहूचें तींत कोकिळा तारस्वानें गाई

पिकें काढुनी शेतकऱ्यांनीं रानीं रचुन बुचाडें
खळीं घातलीं धान्य मळाया मोगण आणिक माडें

मात्र पाणथळ रानीं होतीं अजुन ऊस—जिराईं
हिरवट पानें पिवळीं झालीं परी उन्हाच्या तापें

चालू झालीं कुठें गुऱ्हाळें, अमाप कोठें सरलीं
वैपुल्याच्या आनंदानें राई—रानें भरलीं.

'आंबराई' या काव्यांतून. गिरीश

## ६७ गालबोट

माझ्या छकुलीचे डोळे दुध्या कवडीचे दात
बाई ! कमळ कमळ गोड चिडीचें ग नांव !
जरि बोलते ही मैना माझी अजून बोबडे
मला लागति ते बाई खडीसाखरेचे खडे !
सर्‍या जगाचं कौतुक हिच्या झांकल्या मुठींत
कुठें ठेवूं ही साळुंकी माझ्या डोळ्याच्या पिंजऱ्यांत !
कसे हासले ग सुदकुन माझ्या बाईचे हे ओठ
नजर होईल कोणाची लावुं या ग गालबोट !

सौ. विष्णु भिकाजी कोलते

## ६८ अज्ञात नाथास

आहेस तूं जगीं हें खोटें खरें न ठावें.
नाथा, तथापि तूतें मी आहतों स्वभावें.

येशील का कुठूनी केव्हां कसा कळेना,
मी जागण्याच मार्गीं शोधीत तूज धावें.

स्वर्गांतुनी मनाच्या घे स्रोत भावगंगा,
अन् ही सदाशिवाच्या शीर्षींच शांति पावे.

जाऊन दूर राया, लोपे मनीं न माया,
कषायवेश का या हृत्संगिनीस भावे ?

भांडार लुटवाया केले प्रयास वाया,
सौभाग्य अंतरींचें वाढे तुझ्या प्रभावें !

प्रीतीच ज्योत ज्याची तो दीप जन्म माझा
गाभारियांत तुझ्या नंदादिपें जळावें.

काळीज धुगधुगे तों कर्तव्य हें टळेना,
अन् गात गात ध्यावें हेंही तुझ्याच नावें.

आल्याच दुर्बला मी मग्दूर काय माझा ?
स्वामी, धरूनि हातीं वेदीस चाढवावें.

कोठें घरीं, वनीं वा दर्यावरी, रणीं वा,
सामीप्य गाढ तूझें चित्तीं सदा फुलावें.

येवो अथांग पाणी, धारा असो तुफानी,
जावो पुढेंच तारूं, घेवोत हेलकावे !

क्रांती तुझ्या स्मिताची संजीवनीच माझी,
रे, मृत्युभीति चित्तीं प्रीतीमुळें न मावे.

माधव ज्यूलियन्

मी दूरचींच दर्शें — पाहावया न वांछीं
भूमी पुढें दिसावी एकाच पाउलाची
नव्हती तुझ्या कृपेची जाणीव आजवेरी
पथ कोणता धरावा हेंही न मी विचारीं
असतां प्रभा दिनाची चित्तास रंजवाया
होतें अहंपणाचें अधिराज्य मानसीं या
परि सर्व मागचे हे अपराध विस्मरोनी
तिमिरांत या कृपाळा ! दे मार्ग दासवोनी
होवां तुझ्या कृपेची वृष्टी घनांधकारीं
सरिता, गिरी, वनें हीं होतील लंघ्य सारीं
व्योमीं प्रभा उषेची पसरेल आणि अंतीं—
दिसतील हांसतांना स्वर्गीय आननें तीं.

[२]

## सुफी गीत

[ चाल—पाखरा येशिल का परतून. ]

दूर दे अहंभाव फेंकून।
ये बाहेरीं निज हृदयाचें मंदिर तूं सोडून्
स्वामीसाठीं सर्व सिद्धता तेथें ठेव करून् ॥
तूं बाहेरीं आल्यावर तो येईल मग चालून्
आत्मरूप तो प्रकट तुजपुढें करील आनंदून् ॥

[३]

## झरतुष्ट्रप्रणीत स्तोत्र

[ चाल—भारतका डंका ]

अवनम्र पदीं तव जगदात्मन्।
स्तुतिगीत सुरें नित मम वदनीं
हृदयांत भरे द्युति सत्याची
सुविचार सदा दे स्फूर्ति कर्मीं.

सामर्थ्य चढे मज आत्मबलें
मी याचक मङ्गद ! तुझ्या दारीं
पडसाद पुन्हां मम गीताचे
येतात तुझ्या गीतागारीं.

## स्वाध्याय

१७. अमेरिकन मुलगी. गुलाब, केवडा, भुंगा, कळी, पोवळीं ह्या उपमा कोणत्या अवयवांस दिल्या आहेत ?

ह्या मुलीकडे पाहून कवीला कोणते विचार सुचले ते सांगा.

देश, धर्म, जाति भिन्न असली तरी मुलांविषयीं कवींना सारखेंच वात्सल्य वाटतें. या कवितेंत ही मुलगी 'अमेरिकन' आहे असा अर्थ ध्वनित करणारे कोणते शब्द आहेत ?

१८. होनाजी बाळ. 'महाराष्ट्र-रसवंती' भाग पहिला, यांतील होनाजी बाळाची मूळ भूपाळी वाचा.

होनाजी बाळ ज्या काळांत जन्मला त्या काळांतील वीर पुरुषांचें वर्णन द्या.
मला तुझ्यासारखें कवित्व नाहीं, असें कवि कां म्हणतो तें सांगा.
कवींनीं दुसऱ्या कवीस उद्देशून लिहिलेल्या कविता पहा.
( चंद्रशेखर-दत्त कवि, तेंभे; बी-कविवंदन, नागेश )
या प्रकारच्या दुसऱ्या कांहीं कविता शिक्षकांना विचारून वाचा.

५९. पहा हो कसा हा कारागीर. चंद्रशेखरांच्या 'तारानरंग' या कवितेंतील

'अंबरें तारका शोभती सुंदर
तारकांही दिसे शोभिवंतांवर'

या ओळीशीं समान अशा या कवितेंतील ओळी शोधून पहा. 'तारानरंग' कविता याच भावनेची आहे.

'गजनीचा पट भरजरी' ही कल्पनेची भरारी पहा आणि तिचा अर्थ स्पष्ट करा.

रात्रीच्या काळ्या आभाळाला पडलेल्या तारकाच्या छिद्रांतून पलीकडे अखंड तेज दिसतें अशी कल्पना गडकऱ्यांनी आपल्या प्रेमसन्यास नाटकात केली आहे

६० घनाभिनंदन मेघाचें सेनापतित्व स्वतच्या शब्दात वर्णन करा कोपविवशा, तुषर्दे, रूपापाग या शब्दाचे अर्थ करा मेघाचा महिमा या विषयावर कवितेच्या आधारानें एक निबध लिहा

६१ प्रबोधन 'रेंदाळकराची कविता' या काव्यसग्रहांतील त्याचें चरित्र वाचा

'महाराष्ट्र-रसवती' भाग दुसरा यातील भवानी शकर पडिताची कविता व ही कविता यातील कोणती तुम्हाला आवडते व ती कां ?

६२ कुमारी पिरोजा नपा=पोटच्या शाद्वल्म्=वागेतील हिरवळ गिरेबाज= डौलानें गिरक्या घेणारी व पिसारा उभवणारी कबूतराची जात माधव ज्यूलियन् याचीं दुसरीं शब्दचित्रें सुनीतांजली, गज्जलांजली, विरहतरंग, सुधारक वगैरे काव्य ग्रथात सांपडतील माधव ज्यूलियन् हे आपल्या कवितांचीं नेहमीं परिष्करणें करीत असतात नवीन नवीन कल्पना अतर्भूत करणें, न रुचणारे वाक्प्रयोग बदलणें, स्वतची आवडनिवड व मतें बदलल्यामुळें फार्शी शब्दाऐवजीं शुद्ध मराठी शब्द योजणें हें त्यांचें मधून मधून सारखें चालू असतें यामुळें ही कविता पूर्वी प्रसिद्ध झालेल्या कवितेहून बदललेली आहे असें तुम्हाला दिसून येइल

६३ आळंदीची पालखी कर्वी मढ्ढीं, वाघिणीचें दूध, पुडलिक, जनाइ, नामदेवाचा अभग यांचे सदभ सागा

६४ मातीच्या मळ्यात कोंकणप्रांतीय वर्णनें करणाऱ्या कान्दरे व कारे या कवींच्या कविता पुन्हा वाचा कवि माधवदेव यांची इस्लेवाली व ही कविता यांत काय फरक तुम्हास दिसतो ?

तारायत्राच्या तारेंतून दूर देशातील नैसर्गिक सगीत किंवा मानवी सगीत ऐकूं येणें शक्य झालें तर, आणि कवीचा दृष्टिकोन निराळा असला तर कवि कोणते उद्गार काढील तें थोडक्यात सागा

६६ खेड्यातील दृश्यें राजवाडे याच्या वसतऋतु ( रसवती–भाग पहिला, पृष्ठ ३६ ), वर्षाऋतु ( रसवती–भाग दुसरा पान ४४ ) या कवितांचा व प्रस्तुत कवितेची तुलना करा

,एखाद्या इग्रजी ऋतुवर्णनात्मक कवितेचें भाषातर वाचून या कवितांत कोणतें साम्य आढळतें तें सांगा

**Treasures of English verse** –Written in March–*Wordsworth*, A wintry picture–*Alfred Austin*, July—*Pamela Tennant* 'Thomson's seasons' या कवितापैकीं एखादी कविता समजावून घ्या, म्हणजे ऋतुवर्णनाची जुनी संस्कृत पद्धति व इग्रजी धर्तीची नवीन मराठी पद्धति यांतील फरक तुम्हाला कळेल

६७ **गालबोट** या कवितेंत तुम्हाला वऱ्हाड–नागपुरकडे प्रचारात असलेले शब्द आढळतील या शब्दांना तुमच्या प्रांतात रूढ असलेले शब्द योजून पहा खानदेशी, मावळी, कोंकणी व सातारा प्रांतातील भाषा योजून लिहिलेल्या कविता वाचा मराठी भाषेच्या वृद्धीस या प्रघाताचा किती उपयोग होईल ?

ही कविता वात्सल्यरसाचें उदाहरण आहे 'महाराष्ट्र–रसवती' भाग पहिला यांतील वात्सल्यगीतांबरोबर ही कविता वाचा

प्रो कोलते यांच्या 'लव्हाळीं' या सग्रहातील लव्हाळीं, अगाई, आटपाट नगरांत या कविता वाचा

६८ **अज्ञात नाथास** गंगा, दीप, हीं रूपकें कशास उद्देशून आहेत ?

'रे मृत्युभीति चित्तीं प्रीतीसवें न मावे' ही सुभाषितवजा ओळ आहे अशा पांच ओळी दुसऱ्या काहीं कवितेंतील द्या

टिळक कवींचें 'फिरग्याचें गीत' ( मिसस ब्राउनिंगच्या कवितेचें रूपातर ) वाचा

> " जन्ममरणाची विसरलों चिंता, तू माझा अनंता मायबाप ।
> चालों वाटे आम्ही तुझाचि आधार, चालविसी भार सर्व माझा ॥ "

या तुकारामाच्या अभंगातील ओळींच्या साहाय्यानें या कवितेचें स्पष्टीकरण द्या

६९ **मातृभोजन** कोंगर, शैशव, ध्वज यांचे अर्थ या शिक्षण संपवून घरीं जाणाऱ्या शिष्यास गुरु म्हणतो आहे अशा अर्थाचें एक लहानसें एकमुखी भाषण (नाट्यछटा ) लिहा